# प्रस्तावना

'सोन्याचे देव' हें श्री. नाना जोगांचें दुसरें नाटक आहे. त्यांचें पहिलें नाटक 'चित्रशाळा' गेल्या डिसेंबर महिन्यांत प्रसिद्ध झालें. माझे मित्र आचार्य दादा धर्माधिकारी यानी त्या नाटकाला आपली विस्तृत प्रस्तावना लिहून त्याचा योग्य असाच गौरव केला. 'चित्रशाळा' अजून रंगभूमीवर आलें नाही. असें होण्याचें कारण, जोगांना हवी तशी, त्या नाटकाला साजेशी हौशी 'शोभा' अजून त्याना उपलब्ध झाली नाहीं हें आहे, असें जोग म्हणतात.

'सोन्याचे देव' या नाटकाच्या बावतींत मात्र ती अडचण जाणवणार नाहीं असें त्यांच्याप्रमाणें माझेंहि मत आहे. 'चित्रशाळे'पेक्षां हें नाटक रंगभूमीवर वठविणें अधिक सोपें आहे चांगला नटसंच उपलब्ध झाला तर हें नाटक चागलेंच रंगेल व अत्यंत परिणामकारक होईल याविषयीं मला मुळींच शंका नाहीं.

## सज्जन-दुर्जन संग्राम

सज्जनांचा दुर्जनांशीं जो झगडा आजपर्यंत सदैव चालत आला आहे त्याचेंच सद्यःपरिस्थितींतील एक कौटुंबिक चित्र या नाटकांत नाटककारानें रंगविलें आहे. एका बाजूला काळ्या बाजाराचीं व लुचपतखोरांचीं स्वार्थ-निष्ठ कृष्णकारस्थानें, आणि दुसऱ्या बाजूला स्वतः अनासक्त राहून मानव-सेवा करूं पहाणाऱ्यांची त्यागनिष्ठ धडपड; एकीकडे अमीर आणि दुसरी-कडे फकीर; अशा दोन परस्परविरोधी प्रकृतींचा जो झगडा आज आपल्या देशांत चालला आहे, त्याचेंच हें नाटक एक निष्ठुर चित्र आहे. फकीरी बाण्याचा पुरस्कार करणारे भाऊसाहेब, अर्थशास्त्राची गुंतागुंत जिला मुळींच कळत नाहीं अशी त्यांची भोळी व अल्लड कन्या प्रेमा, आणि आपल्या मायावी पाशांत तिला विवाहबद्ध करून, भाऊसाहेबांच्याच घरांत राहून हळूंहळूं तिला आपल्या कृष्णकारस्थानांत सफाईनें गुंतवणारा घरजांवई भालेराव, या तीन प्रमुख पात्रांवर या नाटकाचें कथानक उभारलें आहे.

प्रत्येक अंकांत नाट्यप्रसंग भरपूर आहेत, आणि आधुनिक एक-अंकी-एक-स्थळी तंत्राच्या या चार अंकी नाटकांत प्रेक्षकांची उत्कंठा ताणून ठेवण्याचें उदंड सामर्थ्य आहे. रामायण-महाभारतांतील अनेक दृष्टान्तांमुळें या नाटकांतील सूत्राचा युक्तिवाद इतका पीळदार झाला आहे कीं त्याच्या फांसांतून प्रेक्षकांची सोडवणूक सहजासहजीं होणार नाहीं.

## गांधीवाद विरुद्ध भांडवलवाद

या नाटकांतील संग्राम मुख्यतः 'गांधीवाद विरुद्ध भांडवलवाद' अशा स्वरूपाचा आहे. सज्जनाची हत्या करणारा दुर्जन नष्ट होत नाहीं तोंपर्यंत दुर्जनांचाच विजय होत असतो हा अनुभव नवा नाहीं. परंतु दुर्जनांच्या तात्पुरत्या विजयाला सज्जनांची सत्प्रवृत्तीच आज कारणीभूत होत आहे हा भयानक सिद्धान्त नाटककारानें खुद्द एका दुर्जनाकडूनच वदविल्यामुळें, या नाटकांतील बेरड खलपुरुष भालेरावच या नाटकाचा नायक असल्यासारखा वाटतो. रामाची विरोधभक्ति करणारा शंकराचा उपासक रावण, देवांची आराधना करून देवांनाच जड झालेला बली राजा, कोणत्याहि परिस्थितींत मरण येऊं नये असा वर देवाकडून मिळवून देवभक्तांचा छळ करणारा हिरण्यकश्यपु—रामायण-महाभारतांतील हे राक्षसच या आधुनिक ब्रह्मराक्षसाचे पूर्वज आहेत. सर्व शस्त्रांचा व शास्त्रांचा स्वार्थासाठीं आणि स्वरक्षणासाठीच उपयोग करणारा, सोन्याच्या खांबावर आपला राजवाडा बांधू लागलेला या नाटकांतील राजा भालेराव, सोन्याच्या देवांना सोन्याच्या विटांपेक्षां अधिक महत्त्व देत नाहीं. ऐतिहासिक न्यायानें आपल्याला मरण यायचेंच झालें तर तें कोणाकडून कसें येईल हें, इतिहास-पुराणांचें सूक्ष्म अवलोकन करून त्यानें आपल्या मनाशीं ठरवून ठेवलें आहे. साऱ्या मानवी मूल्यांना आपल्या स्वार्थाच्या विशाल उदरांत गडप करून टाकणारा हा 'हिरण्य' कशिपु, आपलें मरण, साऱ्या बंदोबस्तावर मात करणाऱ्या आधुनिक 'नरसिंहा'च्या हातीं आहे हें जाणून आहे. परंतु जोंपर्यंत त्या नरसिंहाला जागृत करण्याऐवजीं त्याचा 'ग्रामसिंह' बनवूं पहाणारी आजची वर्गनिष्ठ समाजव्यवस्था अस्तित्वांत आहे— समाज 'गाढवाच्या पाठीवरून, कोरडे ओढत, स्वर्गाच्या सफरीवर निघाला आहे'— तोंपर्यंत तो गाढवाबरोबर उकिरड्याचीच वाट धरणार हें त्याला नक्की माहीत आहे. या नरराक्षसानें, पिठांत पाणी काल-

वून दुधाची तहान भागवणाऱ्या अश्वत्थाम्याप्रमाणें स्वतःच्या जीवनाला सुरुवात केलेली असते, आणि पुढें शेंकडों हत्तींचें बळ कमवून आजच्या निर्बल समाजांत अश्वत्थाम्याचें चिरंजीवित्वहि आपल्याला प्राप्त होईल असा त्याला विश्वास वाटतो. द्रौपदीची भरसभेंतील विटंबना शांतपणें सहन करणारे शांतीचे पर्वत असलेले मोठमोठे आचार्य अखेर 'दुःशासनां'चेच पाठिराखे होतात आणि 'धर्मा'ला विजयाचे नुसते आशीर्वाद देतात; अश्वत्थाम्या-पुढें हात टेंकून मोठमोठे महात्मे, धर्मराज, युधिष्ठिरहि अर्धसत्याचा अवलंब करतात, आणि सदेह स्वर्गारोहण करीत असताना, आपल्या असत्यावर स्वाक्षरी करण्यासाठी निदान आपला अंगठा तरी या सत्यसृष्टीवर सोडून जातात; रावणाचा वध करूनच रामराज्य प्रस्थापित होऊं शकतें; त्याच्याशीं बंधुभाव जडविणें सत्यवादी प्रभु रामचंद्रालाहि अशक्य झालें;— व्यास—वाल्मिकानें प्रतिपादलेले हे सारे सिद्धान्त या फ्रॅंकिन्स्टाईनला तोंडपाठ आहेत ! अशा या आधुनिक दैत्याला नष्ट करावयाचें झाल्यास तितक्याच आधुनिक हत्याराची गरज आहे ही गोष्ट, जोगांनीं या नाटकांत या मायावी दैत्याचें खरें स्वरूप अगदीं नागडें करून सुचविली आहे.

## सदाचाऱ्यांचाहि उपयोग दुराचाऱ्यांनाच !

आज गांधीवाद्यांच्या सदाचाराचाहि उपयोग आपल्याला कसा होतो हें तो स्वतःच या नाटकांत अगदीं बेशरमपणें आपल्या तोंडानें सांगतो ! तो म्हणतोः—

'सांगूं ? सैतानाला सैल सोडताहात बरं ! तुम्हीच सांगा — महात्मा गांधींच्या पवित्र अस्थींचा जो बटवडा जगभर झाला, नि हप्त्याहप्त्यांनीं त्या अस्थींचं जें विसर्जन करण्यांत आलं, त्याला आधार दाखवा बरं एखाद्या शास्त्रवचनाचा ! — गांधीजींच्या आत्म्याला तरी आवडला असेल का तो तमाशा ? पण तो तमाशा करणारे भूदेव होते ना ! त्यांचा राजकीय बाजार-भाव वाढणार होता ना ! — म्हणून तुम्ही हा अधर्म सहन केलात ! — नव्हे, तुम्ही या असल्या अशास्त्रीय विसर्जनाच्या प्रसंगीं स्वाहाकाराचे मंत्रोच्चार केलेत ! मग मलाच कां नांवं ठेवतां ! न्यायदेवतेचं प्रेम तुमच्या (सोन्याच्या) देवांवर बसलं, नि असल्या 'कोटिंग'चा कुणाला संशयसुद्धां येणार नाहीं असा तिला विश्वास वाटला ! मग समाजांत माझा बाजारभाव टिकवण्या-साठीं मीहि म्हटलं, "न्यायदेवतायै स्वाहा !" तर बिघडलं कुठं !!'

महात्मा गांधींच्या अस्थींची जी प्रांतवार विभागणी करण्यांत आली व त्यांचें जें हप्तेवारीनें विसर्जन करण्यांत आलें तें विनोबाजी भावेंसारख्या, गांधीजींच्या अनुयायांना मुळींच आवडलें नाहीं हें सर्वश्रुत आहे. अस्थि-विसर्जनाच्या या प्रकाराला आपल्या शास्त्रांत कुठेंच आधार नाहीं, हेंहि खरें आहे. परंतु अशास्त्रीय व अप्रिय असा हा प्रकार विनोबाजींनीं जो मान्य केला त्याच्या मागें असलेला सहृदयतापूर्ण सद्धेतु हाच होता कीं गांधीजींच्या कोटयवधि भक्तांना त्यांच्या मर्त्य अवशेषाचें निदान अल्पतरी दर्शन घडावें. खरी वस्तुस्थिति ही आहे. तरीपण गांधीजींच्या अस्थींचा एखादा कण आपल्या वांट्याला आला तर आपला राजकीय भाव वाढेल हा असद्धेतु मनाशीं बाळगून, गांधीवादाचे वस्तुत: कट्टर शत्रु असलेले आणि तरीहि कॉंग्रेसचें पुढारीपण बळकावून बसलेले आमच्या प्रांतांतील मान्यवर ढोंगी त्या कणासाठीं धडपडले हेंहि तितकेच खरें आहे !

## विद्रोह : विपर्यास : विघात

ऐतिहासिक सत्याचा जे विद्रोह करतात ते आपल्या पापांचें मंडन करण्यासाठी प्रथम त्या सत्याचा विपर्यास करतात, आणि अशा रीतीनें जनतेच्या डोळ्यांत धूळ फेंकून मगच जनतेचा विघात करतात. प्रस्तुत नाटकांतील भालेराव जेव्हां कोंडींत सांपडतो तेव्हां तो आपल्या लुचपतखोरीचें तर्कशुद्ध मंडन करण्यासाठीं प्रथम विनोबाजींसारख्या सहृदय माणसाच्या सद्धेतूचा विपर्यास करतो आणि त्या सद्धेतूची आपल्या असद्धेतूशीं तुलना करून आपलें आचरण किती तर्कशुद्ध आहे हें भाऊसाहेबांना पटवूं पहातो. आज कॉंग्रेस-मधें आणि कॉंग्रेसच्या राजवटीमधें हा प्रकार आपल्याला प्रत्यहीं पहावा लागत आहे. कॉंग्रेसनें प्रतिपादलेलें सत्य – अहिंसात्मक सदाचरण राजकारणांत निरुपयोगी आहे असा समज असणारांची व सदाचाराचा उपहास करणारांचीच संख्या कॉंग्रेसचे अनुयायी म्हणवणारांत वाढत चालली आहे. ते स्वत: सदाचरण तर करीत नाहींतच, परंतु त्यांचे जे श्रद्धावान् सहकारी प्रामाणिकपणें तसा प्रयत्न करतात त्यांचा दुरुपयोग आणि विघात मात्र ते करीत असतात. गांधीजींच्या अस्थींच्या पावित्र्याचा भालेरावला आलेला पुळका असल्याच ढोंगी विपर्यासाचा मासला आहे ! भाऊसाहेबांपुढें आपल्या

गांधीभक्तीचें नाटक करणारा तोच भालेराव, आपल्या भोळया पत्नीच्या, सन्मार्गाला लागण्याच्या प्रयत्नांची अत्यंत अमंगळ अशी थट्टाहि करतो तो म्हणतो :—

‘ उगीच कशाला हा नाटयावेश ! भाऊसाहेबांची ती सत्य-अहिंसा !– तो तुझा शांतू !– ती त्याची कामगार चळवळ !– ती क्रांति !– ऑगस्ट-मधली असो नाहीं तर ऑक्टोबरमधली असो ! अग, तो निव्वळ कादंबरी होती ! — एक अद्‌भुतरम्य असा, गोडसा अपघात होता तो तुझ्या सरळ-मार्गी आयुष्यांतला !– आपल्याला काय करायचं आहे त्याच्याशीं !– खरं म्हणजे सोनं हाच आपला देव आहे !– गोंडस नांव देऊन अगदीं लिमिटेड बंधूंची एखादी कंपनी स्थापन करू नि अन्‌लिमिटेड सोनं सांठवूं – मग देऊं त्या सोन्याला पुन्हां देवांचा आकार !– हं, चल ऊठ बरं ! उपाध्येसाहेबां-कडे गेलं पाहिजे लौकर, त्याचे आभार मानायला ! अग, लुचपत खाऊन-सुद्धां तिच्याशी बेइमानी न करणारा न्यायाधीश मिळायलादेखील नशीब लागत आजकाल !

उफराटया इमानदारीच्या पावलांनी चालणारे भालेरावचें हें भूत रंग-भूमीवर आणून जोगांनीं एक मोठे कार्य केलें आहे. इतिहासाच्या प्रवाहावर तरंगत पुढें चाललेल्या, मानवी स्वातंत्र्याच्या नौकेसमोर कोणत्या जातीचा विघातक काळा खडक त्या प्रवाहाखालीं ‘आ’ वासून दडून बसला आहे हे, त्या खडकांतील एक फत्तर पुढें आणून त्यांनीं दाखविलें आहे, आणि जनतेला सावध केलें आहे.

## हृदयशून्यांचें ‘ हृदय ’ परिवर्तन !

भाऊसाहेब मृत्युवश होऊन एक मिनिटहि झालेलें नसतें. इतक्यांत सोन्याच्या देवांच्या चोरीचा सुगावा पोलिसला लागला आहे हें भालेरावला कळतें. तत्क्षणीच तो, त्यानें भाऊसाहेबांची केलेली हत्या विसरून निर्घृणपणें आपल्या बचावाच्या तयारीला लागतो ! लुचपत हेंच त्याचें हत्यार आहे. नाटकीपणा ही त्या हत्याराची म्यान आहे. ‘ माझ्या राजवाडयांतली सोन्याची एकेक वीट तोंडावर फेंकून मारली तर कोण माझ्याविरुद्ध ब्र काढणार आहे !’ हें त्याचें स्वसंरक्षणतंत्र आहे. कसल्याहि बिकट प्रसंगांतून निसटायला त्याला एका पळाचा अवधि पुरतो, कारण तेवढया अवधींत

एखाद्या पटाईत नटाप्रमाणें, प्रसंग पडेल तशी भूमिका वठवण्यांत त्याचा हातखंडा आहे. कधीं खेळाडू वृत्तीचें, कधीं शोकविव्हल झाल्याचें, कधीं शरणागतीचें तर कधीं मरणागतीचेंहि — कसलेंहि सोंग बेमालूम वठविणें त्याच्या हातचा मळ आहे. राम–रावणयुद्धाला तोंड लागण्याच्या आधल्या दिवशीं रावणानें खेळाडू वृत्तीचें ढोंग करून, रामाला आपल्या घरीं आग्रहानें भोजनाचें निमंत्रण दिल्याची एक आख्यायिका आहे. या 'खेळाडू वृत्ती'च्या ढोंगामागें जो असद्धेतु होता तो हाच होता कीं अखेरची वेळ आलीच तर सदाचारी रामचंद्राला निदान असें हिणवतां तरी यावें कीं, 'अरे राम! – तूं कसला राम! तू निमकहराम आहेस!' अशा हृदयशून्य फत्तराचें हृदय-परिवर्तन झालेलें पहाण्याचें सद्भाग्य आपल्याला कधीं लाभेल ही आशा व्यर्थ आहे!

## वर्गभेदाचा दुर्भेद्य तट

मानवी स्वातंत्र्याच्या मार्गांत आज जीं जीं विघ्नें आडवीं येत आहेत त्यांच्या मागें एकच आसुरी शक्ति उभी आहे. संपत्तीवरील व्यक्तिस्वामित्व हीच ती शक्ति. या शक्तीचा समूळ उच्छेद झाल्याशिवाय माणसाच्या मानगुटीवर बसलेलें पारतंत्र्याचें पिशाच्च कदापि आपले झाड सोडणार नाहीं. सन्मार्गाला लागण्याची शपथ घेतलेली प्रेमा अगदीं न कळत आपल्या देवांची किंमत अखेर रुपये–आणे–पैतच करते हा त्या शक्तीचा केवढा आसुरी पराक्रम म्हटला पाहिजे! या सैतानी शक्तीनें आत्मसंरक्षणार्थ जे नानाविध उपाय तयार ठेवले आहेत त्या सर्वांत अत्यंत मजबूत उपाय म्हणजे वर्गभेदाचा दुर्भेद्य तट. आकाशयुद्धांत निष्णात असलेला रावणपुत्र इंद्रजित ज्याप्रमाणें ढगांच्या आडून धर्मयुद्धाच्या नियमांनीं लढणाऱ्या रामचंद्राच्या सेनेवर शस्त्रास्त्रांचा वर्षाव करीत असे, त्याचप्रमाणें परशोषणास चटावलेला, रावणाचा आधुनिक वंशज जो भांडवलदार तोहि वर्गभेदाच्या तटामागें उभा राहून सत्य–अहिंसेचें आचरण करूं पहाणाऱ्या गांधीजींच्या अनुयायांना आणि साऱ्या जनतेला आपल्या अनर्थकारक शस्त्रांनीं जर्जर करीत आहे. वर्गभेदाच्या तटामागून लढणाऱ्या अशा शत्रूचा पराभव करावयाचा असल्यास प्रथम वर्णोच्छेद करण्यावांचून गत्यंतर नाहीं.

तथापि, ज्या अत्याचारी मार्गानें यूरोपांत वर्गनाश करण्याचे प्रयत्न

चालले आहेत त्या मार्गाचा आपण अवलंब करूं नये असें काँग्रेसचें म्हणणें आहे. आणि म्हणून तिनें महात्मा गांधीप्रणीत सत्य–अहिंसात्मक मार्गाचा स्वीकार आग्रहपूर्वक आज्ञापिला आहे. काँग्रेसच्या मार्गानें जाणाऱ्या निरपेक्ष लोकसेवकांनीं याच दिशेनें यत्न करणें त्यांचें कर्तव्य ठरतें. परमेश्वरकृपेनें त्यांच्या या प्रयत्नास यश येवो अशीच कोणीहि प्रार्थना करील. परंतु आज तरी आपल्या देशांत परस्वापहार–बुद्धीची आणि परशोषण प्रवृत्तीची बेसुमार वाढ झाली आहे. सरकारी अधिकाऱ्यांची लुचपतखोरी आणि खादीधारी व्यापाऱ्यांचा काळाबाजार यांची जोडी जमली आहे. ही जोडी फोडून, या दुराचाऱ्यांना ताबडतोब भरडून, वर्गरहित – म्हणजे परशोषणविरहित – समाजरचना जर या देशांत निर्माण केली नाहीं तर कोणकोणत्या अघोर आपत्तींतून या देशाला आपला मार्ग आक्रमावा लागेल याची कल्पनाहि करवत नाहीं. दुर्दैवाने खुद्द काँग्रेसच जर परशोषक समाजभक्षकांच्या आहारीं पडली तर पुढचें भविष्य न वर्तविणेंच बरें ! काँग्रेसमधून हें पाप बाहेर पडले तरच आशेला जागा आहे. नाही तर हिंदुस्थानांत वर्गकलहाचा प्रलयाग्नि पेटून त्याच्या प्रचंड होमकुंडांत जनतेची राखरांगोळी होईल हें सांगावयास नकोच !

सोन्यावर स्वामित्व गाजवणारी आणि समाजांत कलह माजवणारी आसुरी शक्ति या नाटकांतील ‘ हिरण्य ’ कशिपु जो भालेराव त्याच्या तोंडून आपली अमरत्वाची महत्त्वाकांक्षा स्पष्ट शब्दांत गर्जून सांगते आहे :—

‘ मलाहि होतां होईल तों मरण येऊं नये म्हणून मीहि खटपट करतों. घरांत – घराबाहेर, जमिनीवर – आभाळांत, माणसाकडून – पशूकडून, शस्त्रांनीं–अस्त्रांनीं, दिवसां–रात्रीं, केव्हांहि–कसंहि मरण येऊं नये म्हणून मीहि सर्व शस्त्रांचा व शास्त्रांचा उपयोग करतों ! ’

महात्मा गांधींनीं सत्याग्रहाचें व अहिंसेचें जें अमोघ शस्त्र व शास्त्र आकारास आणलें त्याचाहि हा नरराक्षस आपल्या स्वार्थासाठीं ढोंगी उपयोग करणारच नाहीं अशी छातीवर हात ठेवून कोणीहि ग्वाही देऊं शकणार नाही !

सत्य–अहिंसेची वरपांगी पूजा करणारे भामटे काँग्रेसमधें आज जिकडे तिकडे शिरले आहेत ही दुर्दैवानें वस्तुस्थिति आहे. आपला मृत्यु कसांत

आहे हेंहि ते ओळखून आहेत. या भामट्यांचा या नाटकांतील प्रतिनिधी भालेराव म्हणतो :–

'पण इतकहि करून माझ्या साऱ्या कडेकोट बंदोबस्तावर मात करणारा एक अखेरचा ऐतिहासिक पेंचप्रसंग येईलच! त्या प्रसंगीं मला उबरठ्यांत मारणारी शक्ति माझ्यासमोर उभी होईल! महादेवासारख्या, हालाहल पचवणाऱ्या, उघड्यावर, थंडीवाऱ्यांत रहाणाऱ्या, अर्धनग्न, व्यसनी – ज्यांना आपण नंगे म्हणतों! – अशा नंग्या माणसांतली माणुसकी, सिंहासारखं पाशवी साहस, आणि निसर्गासारखा निर्घृण न्याय एका तिन्हीसांजेच्या वेळीं एकत्र होऊन नरसिंहासारखा जागृत होईल! त्या क्षणी माझा सोन्याचा खांब दुभंगून पडेल, आणि उंबरठ्यांत, माझ्या विशाल उदराला नख लागून माझी आतडी बाहेर येतील!'

असा हा पेचप्रसंग टाळण्याची खटपट हा 'हिरण्य' कशिपु सतत करीत रहाणारच, आणि नरसिंहाचा 'ग्रामसिंह' बनवण्यासाठी वर्गभेदावर आधारलेल्या आपल्या साऱ्या युक्त्याप्रयुक्त्या उपयोगात आणणारच! आपल्या पूर्वजाला 'नरसिंहा' कडूनच मृत्यु आला या इतिहासापासून जो धडा घ्यावयाचा तो घेऊन हा विसाव्या शतकातील हिरण्यकशिपु 'बापसे बेटा सवाई' होण्याचा यत्नहि करणारच!

## हिंसा–अहिंसेच्या सीमारेषा

हिंदुस्थानातील जनतेपुढें आज उभा असलेला प्रसंग अशा प्रकारचा आहे. एकीकडे, भाऊसाहेबांसारख्या निरुपद्रवी पण निर्बल सदाचाऱ्याची एका खुनी मारेकऱ्यानें केलेली हत्या आपल्या डोळ्यांपुढें उभी आहे. दुसरीकडे, मारेकऱ्याची आतडीं बाहेर काढून त्याला शिक्षा देऊं शकणारी महादेवासारखी प्रलयंकर असूनहि शिवशंकर शक्तीच आपल्याला मारूं शकते हा त्या मारेकऱ्याचाच दावा आहे. नाटक वाचून प्रश्न पडतो तो हा, कीं मारेकऱ्यानें केलेली माणुसकीची हत्या आणि महादेवाकडून मारेकऱ्याला होणारी शिक्षा, या दोन्ही हिंसाच आहेत काय? नाटककारानें हा प्रश्न आपल्यापुढें टाकून आपलें हें 'महाभारत' अर्धेंच सोडलें आहे. तें अर्धवट सोडण्याचें कारण हेंच की आजचे आधुनिक रावण, हिरण्यकशिपु, दुर्योधन, दुःशासन दुर्दैवानें अजून जिवंतच आहेत! 'अखेरीस भालेराव एखाद्या 'पळपुट्या'

सारखा पळून जातोच कीं नाहीं !' अशी निर्भर्त्सना केली म्हणजे भालेराव नामोहरम होईल, हतबल होईल असें मुळीच नाहीं. मरेपर्यन्त तो निराळ्या ठिकाणीं निराळ्या स्वरूपांत आपलें डोकें वर काढीलच. त्याचा उच्छेद नरसिंहासारख्या, परमेश्वरानें धारण केलेल्या मायावी अवताराकडूनच होईल एवढें केवळ सूचित करून जोगांनीं हें आपलें महाभारत अर्धेंच सोडलें आहे. 'माझें हें रंगभूमीवरील जगत् व्यासांचें विसाव्या शतकांतील उच्छिष्ट आहे. उरलेल्या उच्छिष्टाची साखर भालेरावच्या तोंडात पडेपर्यन्त हें अर्धवटच रहाणार' असें जोगाचें म्हणणें आहे.

## इतिहास म्हणजे पुनरावृत्ति नव्हे.

हजारों वर्षांच्या गतीतून मानवाला नवनवीन सत्याचें दर्शन सदैव होत आलें आहे. इतिहासाची पुनरावृत्ति होत असते असें म्हटलें तरी इतिहासाच्या पोटांतील सर्व सत्यें आतां संपली असा समज करून घेणें चुकीचें आहे. जोगांनी या नाटकांत रंगवलेल्या हिरण्यकशिपूचा मृत्यु हुबेहुब पुराणांतील हिरण्यकशिपूला आलेल्या मृत्यूच्या चालीवरच येईल असें म्हटलें तर इतिहासाची कालस्थलाभोंवतालची प्रदक्षिणा संपली असें म्हणण्यासारखेंच होईल ! तेव्हां भालेरावला येणाऱ्या मृत्यूचें स्वरूप कसें राहील, या कूट प्रश्नाचा निकाल, माझ्या मतें, कालावरच सोपविणें बरें !

अमरावती,
मंगळवार, ता. ३ मे १९४९

# नाटकांतील पात्रें

१. **भाऊसाहेब** : प्रांतीय कायदेमंडळाचे सभासद
२. **प्रेमा** : भाऊसाहेबांची कन्या
३. **भालेराव** : तिचा प्रियकर — नंतर पति
४. **पैकू** : भाऊसाहेबांचा नोकर
५. **उपाध्ये** : मॅजिस्ट्रेट
६. **रतीलाल** : एक व्यापारी
७. **मगनभाई** : दुसरा व्यापारी
८. **कोरके** : अकाउन्टन्ट
९. **शशी** : कोरकेची कन्या
१०. **शान्तू** : शशीचा प्रियकर
११. **राम** : भालेरावच्या ऑफिसांतील कारकून
१२. **रायभान** : त्याच आफिसांतील चपरासी
१३. **रिंगे** : अँटिकरप्शन् इन्स्पेक्टर
१४. **एक मॅजिस्ट्रेट**
१५. **एक पोलिस कॉन्स्टेबल**
१६. **एक चपरासी** (उपाध्ये मॅजिस्ट्रेटचा)
१७. **एक डॉक्टर**

(सूचना : रतीलाल, कोरके, चपरासी आणि उपाध्ये, या चार पात्रांच्या भूमिका करणाऱ्या व्यक्ती, अनुक्रमें मॅजिस्ट्रेट, डॉक्टर, पोलिस कॉन्स्टेबल आणि रिंगें या भूमिका वेष बदलून करूं शकतील.)

# अंक पहिला :

( स्थळ : भाऊसाहेब देशपांडे, एम्. एल्. ए. यांच्या घरांतील दिवाणखाना. उजव्या भिंतीला अलीकडच्या कोपऱ्यांत दरवाजा आहे. डाव्या भिंतीला पलीकडच्या कोपऱ्यांत दरवाजा आहे. मधल्या भिंतीला दोन कोपऱ्यांत दोन दरवाजे आहेत. यांपैकीं उजवीकडचा दरवाजा बाहेरून येण्याचा; डावीकडचा भाऊसाहेबांच्या खोलीचा; डाव्या भिंतीचा दरवाजा अंतर्गृहाचा; आणि उजव्या भिंतीचा, भाऊसाहेबांची कन्या प्रेमा हिच्या खोलीचा. उजव्या भिंतीवर टागोर आणि पं. जवाहरलाल नेहरू यांचे दोन मोठाले फोटो लावले आहेत. मधल्या भिंतीवर महात्मा गांधींचा मोठा फोटो आहे. त्याखालीं भाऊसाहेबांच्या दिवंगत पत्नीचा लहानसा फोटो आहे. या फोटोखालीं, लिहावयाच्या टेबलावर एक लहानसें टुमदार देवघर असून त्यांत सोन्याच्या मूर्ती आहेत. डाव्या भिंतीवर भगवान् श्रीकृष्णाची तजबीर आहे, त्या तजबिरीखालीं भिंतीला लागून तख्तपोस आहे. तख्तपोसाच्या पलीकडे एका स्टुलावर रेडियोसेट आहे. उजव्या भिंतीच्या जवळ सोफासेट आहे. या भिंतीला पलीकडच्या बाजूला एक खिडकी आहे. तख्तपोसावर गादीतक्या आहे. सर्व फर्निचरवर अभ्रे-चादरी वगैरे खादीचे आहेत. सोइस्कर अशा जागीं दोनतीन खुर्च्या, फ्लॉवरपॉटसाठीं एखादा स्टँड, सेन्टरपीस, टीपॉय इ. छोटेंमोठें फर्निचर आहे. एका स्टुलावर तबकांत चार हार आहेत व थोडीं फुलेंहि. भाऊसाहेबांच्या पत्नीच्या फोटोखेरीज बाकीच्या तजबिरींना मोठाले हार घातले आहेत. पडदा वर जातो त्या वेळीं शुभ्र खादीचा पोषाख केलेला २८।२९ वर्षें वयाचा देखणा भालेराव अभ्रे वगैरे नीटनेटके करीत असतो. आडदांड व थोडा वयस्क असा नोकर पैकू त्याला

मदत करीत असतो. अर्ध्या–पाऊण मिनिटानें नीटनेटका, उंची पण साध्या रंगाचा पोषाख केलेली, आणि एकदोन नाजुक पण मौल्यवान दागिने घातलेली २६।२७ वर्षें वयाची सुंदर प्रेमा घाईत असल्यासारखी प्रवेश करते. )

**भालेराव :–** ( चोंहींकडे पाहून ) हं, आतां काय राहिलं आणखी ? हो,–खरंच – तुझ्या देवांना हार घालायचा राहिलाच कीं ! ( स्टुलावरील तबकांतला हार उचलूं लागतो )

**प्रेमा :–** ( थोडया थट्टेनें ) रहायचाच ! ( त्याच्या हातांतील हार काढून घेत ) आतां कशाला– तुझे नास्तिकाचे हात लावतोस त्या देवांना !

**भालेराव :–** ( ती देवघरावर हार बसवीत असतांना ) अग, कोणचाहि माणूस अगदीं पक्का नास्तिकहि नसतो अन् पक्का आस्तिकहि नसतो ! केशवसुत तर म्हणतात, ‘ देव–दानवां नरें निर्मिलें ! ’ दानव घडवणारा माणूसच जर देव घडवतो तर त्याला नुसत्या देवांवरच तेवढी श्रद्धा ठेवून कसं चालेल !

( प्रेमा देवांना हार घालून नमस्कार करते आणि त्यांच्याकडे निरखून पहात असते. अशा वेळीं भाऊसाहेब आपल्या खोलींतून प्रवेश करतात. त्यांची शरीरयष्टि रोडकी आहे. वय ५५।६० च्या जवळपास. केंस अगदीं आंखड कापलेले. अंगांत लांब बाह्यांचा शुभ्र खादीचा सदरा व आंखूड धोतर. डोक्यावर शुभ्र खादीची टोपी. एका हातांत मधें बोट ठेवलेलें पुस्तक व दुसऱ्या हातांत सटरफटर कागदपत्रांची लहानशी पिशवी. चालणें मंद आणि बोलणें सार्वजनिक भाषणें करण्याच्या संवईमुळें लांबटसें. )

**भाऊसाहेब :–** ( तख्तपोसावर बसतांना ) अकरा वाजले, भालेराव !

**भाले० :–** ( मनगटावरील घडयाळाकडे पाहून ) बरोबर अकरा वाजले.

**प्रेमा :–** ( भाऊसाहेबांपुढें तबकांतील एक हार धरून ) भाऊ, आईला हार घालतां ना ?

**भाऊ० :–** आण. ( उठून देवघरावरील बाईच्या फोटोला हार घालतात ) अजून मंडळी कशी आली नाहींत ? ( इतक्यांत उपाध्ये मॅजिस्ट्रेट प्रवेश करतात. बूलन सूटवर खादी टोपी असा त्यांचा वेश आहे. वय ४०।४२ चे जवळपास. त्यांच्या मागोमाग त्यांचा चपरासी एक लहानसा बस्ता व त्यावर

सिगरेटचा डबा घेऊन येतो व दारांतच उभा राहतो ) या ! शंभर वर्षें आयुष्य आहे तुम्हांला ! ( नमस्कार करून तख्तपोसावर बसतात. भाऊसाहेबांच्या तख्तपोसाला स्पर्श करून, उपाध्ये त्यांना नमस्कार करतात. भालेराव व प्रेमा उपाध्ये यांना नमस्कार करतात. पैंकू मुजरा करतो. ) बसा ना आपण. पैंकू, पानदान घेऊन ये जा. (पैंकू घरांत जातो) भालेराव, तुमचे साक्षीदार आले नाहींत अजून. साहेबाचा खोळंबा होईल अशानी !

**भाले०** :– यायलाच हवेत सगळे आतां ! – तसे कोरकेहि येणार आहेत शशीला घेऊन ! – लव्ह मॅरेज कसं असतं तें तिला दाखवायला ! (हंसून) तिचं म्हणे प्रेमच बसत नाही कोणावर !

**भाऊ०** :– ( उपाध्ये दिवाणखान्यातील फोटोंकडे पहात उभे असतात त्यांना ) बसा ना आपण !

**उपाध्ये** :– ( देवघराकडे अदबीनें वळून ) कोणाच्या मूर्ती आहेत या ? ( देवांना नमस्कार करतात )

**भाऊ०** :– आमचीं कुलदैवत आहेत ती– अनेक पिढ्यांपासून चालत आलीं आहेत ती आमच्या घराण्यात !

**उपाध्ये** :– ( भालेराव देवघराजवळ येतो त्याला ) ब्यूटिफुल ! काय तेज आहे या मूर्तींचं ! – अगदीं गोल्डन् !

**भाले०** :– गोल्डन् म्हणजे ! – सोन्याचेच आहेत ते ! – शंभर तोळे वजन आहे म्हणतात त्याचं !

**उपाध्ये** :– असं ? अन् हे असे या इथं उघड्यावरच ठेवनां तुम्ही नेहमी ?

**भाले०** :– छे छे ! – नेहमीं घरांत बंदिशाळेत असतात ते ! चांगले पोलादी गजांचे दरवाजे आहेत त्यांच रक्षण करायला !

**उपाध्ये** :– कुठं घडवल्या आहेत या मूर्ती ? आपल्याकडच्या नाही वाटत! [ घडण जरा निराळीच वाटते ]

**भाले०**:– बंगालच्या बाजूला घडल्या असाव्या त्या असा तर्क आहे–मला तर वाटतं, भोसल्यांनीं बंगालची लूट केली ना, त्या वेळीच फितूर होऊन नाहीं तर कैदी म्हणून आले असावेत हे या बाजूला ! ( हंसतो )

**भाऊ०** :– ( हंसत ) भालेराव इंजिनिअर असले तरी त्याचा इतिहास-

पुराणांशीं, देव–दानवांशीं फार घनिष्ट संबंध आहे बरं ! – मोठे अष्टपैलू आहेत ते !

**उपाध्ये** :– ( हसत, देवघरावरील बाईच्या फोटोचा निर्देश करून ) हा फोटो ? —

**प्रेमा** :– ( लांबूनच ) माझ्या आईचा आहे तो– ( उपाध्ये त्या फोटोला नमस्कार करतात )

( पैंकू पानदान घेऊन येतो [illegible] )

**भाऊ०** :– प्रेमा, चहाबिहा तयार ठेवला आहेस ना ?

**प्रेमा** :– सगळी तयारी आहे ! ( उपाध्येना ) बसा ना !

**उपाध्ये** :– ( एका सोफाचेअरवर बसून ) चपरासी ! –

( चपरासी आपल्या हातांतील बस्ता व सिगरेटचा डबा उपाध्येसमोर ठेवतो. बस्ता उघडून त्यांतील रजिस्टर व फॉर्मस् वेगळे करीत ) हं, कसं काय, भालेरावसाहेब, आपलं विल्हेवाट खातं काय म्हणतंय ?

**भाले०** :– ( त्यांच्या जवळ उभा होऊन ) जमत चाललं आहे आतां हळूहळू तिथलं काम मला !

**उपाध्ये** :–असं ना ?–मग एखादी मोटार मिळेल तर पहा कीं, तुमच्या खात्यांतून स्वस्तांत माझ्यासाठीं !

**भाले०** :–स्वस्तांत ? ( हंसतो ) डॅमेज झालेली पहातों त्यातल्या त्यांत बऱ्यापैकीं मिळाली तर एखादी !

**उपाध्ये** :– वा साहेब ! डॅमेज झालेल्या गाडीचे पार्टस् कुठं धुंडाळत बसूं मी?

**भाले०** :– तें खरं, पण चांगल्या मालाची सार्वजनिक विक्री कोणत्या अटींवर, केव्हां करायची तें अजून सरकारनं नीटसं ठरवलं नाहीं–तोंपर्यंत–

**उपाध्ये** :– कधीं ठरणार आहे तें ?

**भाले०** :– व्यापाऱ्यांशीं बातचीत चालली आहे त्या बाबतींत !

**उपाध्ये** :–पण अशांनीं तर चलाख व्यापाऱ्यांचं चांगलंच फावेल ! (रतीलाल दारांत उभे होतात ) आइये रतीलालजी !

( रतीलाल प्रवेश करतात. स्थूल शरीर, मोठ्या मिशा, दहाबारा सोनेरी बटनें असलेला पांढरा लांब कोट, तलम धोतर असा या व्यक्तीचा थाट आहे. दारांत आपला पंप शू काढून ते समोर येतात. )

**रतीलाल** :– जयहिंद ! ( सगळया मंडळींना नमस्कार करीत भाऊसाहेबांच्या तख्तपोसाजवळ जाऊन त्याला स्पर्श करून भाऊसाहेबांपुढें वाकून हात जोडतात. )

**भाऊ०** :– बसा शेठजी ! थोडी तसदी आहे आपल्याला !

**रती०** :– वा भाऊसाहेब ! तसदी कसली त्यांत ? ( हात जोडून ) हः हः हः !

**भाऊ०** :– भालेराव, आणखी कोण यायचं आहे ?

**भाले०** :– मगनभाई यायचे आहेत–खरं म्हणजे यायलाच हवे होते ते आतापर्यंत ! ( मगनभाईची मूर्ति दारात उभी होते. ) आलेच ते !– या शेठजी !

( मगनभाई म्हणजे शेठ रतीलालची ‘सुधारून वाढवलेली’ आवृत्ति आहे. नमस्काराचा प्रकारहि सुधारलेलाच. )

**भाऊ०** :– बसा शेठजी !– उपाध्येसाहेब, आतां आपल्या कार्याला आरंभ करावा आपण–

( भालेराव आणि प्रेमा यांना आपल्या शेजारीं कोचावर बसवून दोघांना रजिस्टरवर आणि डिक्लेरेशन फॉर्म्सवर आपापली नांवें लिहावयास उपाध्ये सांगतात. )

**रती०** :– ( हे चालू असतांना ) भाऊसाहेब, आपल्या एकुलत्या मुलीचं हें लग्न,–कांही समारंभ नाहीं, वाजंत्री नाहीं–कसं बरं वाटतं कोण जाणे आपल्याला !

**भाऊ०** :– आपण सेवाग्राममधें झालेलीं थोरांमोठ्यांचीं लग्नं पहायला हवीं होतीं !– बापूचा आशीर्वाद हाच मोठा समारंभ मानला त्यांनीं ! त्यांच्याच प्रतिमेला साक्ष ठेवून आम्हीहि हें लग्न साजरं करायचं ठरवलं !

**मगनभाई** :– ( गांधीजींच्या फोटोला नमस्कार करून उसासा सोडीत ) हूं !– गेले बिचारे ! आपल्यासारख्या लोकांचा केवढा आधार गेला !

**रती०** :– आमच्या घरीं तर हजारों रुपयांचा चुर्दा उडून गेला असता !– दानधर्मात खर्च झाला असता !–उष्ट्या पत्रावळींत शेंकडों गरीबगुरिबांचीं पोटं भरलीं असतीं ! ( भाऊसाहेबांना ही कल्पना कसीसीच वाटली

असावी हें त्यांच्या चेहऱ्यावरून ध्यानांत येतांच, त्यांना आवडणारा विषय काढण्यासाठी )– विनोबाजी भेटले होते का, अशांमधें आले होते तेव्हां ?

**भाऊ०** :– (विमनस्कपणें) नाहीं–फारच थोडा मुक्काम होता त्याचा !

**पैकू** :– मालक, रेडियू लावू का जी वाजंत्रीच्या बदली ?

**भाले०** :– कां ? आज ' आपकी पसंद ' येणार आहे वाटतं ?

**भाऊ०** :– ( कौतुकानें त्याच्याकडे पाहून ) बरं लाव, लाव !–पण तीं सिनेमांतलीं आचरट गाणीं असतील कस ीं तरी !

( पैकू पडत्या फळाची आज्ञा घेऊन रेडियो चालू करतो. रेडियोवर अब दिन बीतत नाहीं ' चालू असतें. )

**भाऊ०** :– इतकी कला अवगत झाली वाटतं तुला, अं ! हः हः हः !

( कोरके व त्यांची मुलगी शशिकला प्रवेश करतात. कोरकेंचें वय ४५चे जवळपास. शरीरयष्टि रोडकी. दृष्टि कारस्थानी माणसाची. नाकाच्या टोंकावर चष्मा. काळी टोपी भिवयांपर्यंत कपाळावर झुकली आहे अंगांतील धोतर, शर्ट व कोट जरा मळकटच आहेत. शशिकला बेफिकीर दिसणारी, नाकींडोळीं नीटस, पण केसांची व पदराची फारशी जाणीव नसलेली २३।२४ वर्षें वयाची तरुणी आहे. )

**भाऊ०** :– ये शशी ! ( तिला आपल्या शेजारीं तख्तपोसावर बसायला सांगतात. )—तुला (कोरकेला उद्देशून ) कसं कळलं लग्नाचं ? (रेडियोच्या गोंधळामुळें त्याला नीट ऐकूं येत नाहीं हें दिसतांच पैकूला ) अरे, ती वाजंत्री बंद कर बरं ! मला तर रेडियो चालू झाला कीं आगगाडी चालू झाल्यासारखं वाटतं ! हः हः ! ( पैकू ताबडतोब रेडियो बंद करतो. पुन्हां कोरकेला ) म्हटलं तुला कसं कळलं लग्नाचं ? मी कोणालाच आमंत्रण दिलं नव्हतं !

**कोरके** :–फार चांगलं केलं होतं ! मोठीं माणसं आहांत !–आम्ही असं केलं तर आमचं मढं उचलायला चार माणसं मिळणार नाहींत, मेल्यावर !

**पैकू** :–(ही कल्पना अभद्र वाटून ) अजी हे का बोलता जी भलत्या वख्तीं ?

**उपाध्ये** :– ( भालेरावला डिक्लेरेशन फॉर्म देऊन ) हं, आतां हा वरचा मजकूर आपण वाचा.

**भाले०** :– ( उभा होऊन वाचतो ) ' मी बळवंत रामचंद्र भालेराव, बी. एस्‌सी., इंजिनिअरिंग, असें जाहीर करतों कीं—या क्षणीं मी अविवाहित आहें ' ( हंसून ) पण या जाहिरातीचा आतां कांहीं उपयोग नाहीं !

**उपाध्ये** :– (हंसत) मराठींतच वाचलं पाहिजे असं नाहीं – इंग्रजींत वाचा हवं तर.

**भाले०** :–पाहूं तर साहेबाचं मराठी ! (वाचतो)'मी धर्मानें हिंदू आहें–माझ्या वयाला एकवीस वर्षं होऊन गेलीं आहेत ' (हंसत) त्यानंतरचीं ज़वळ जवळ दहा वर्षं लग्नाची उमेदवारी करण्यांत फुकट गेलीं ! (पुन्हां वाचतो) ' डॉक्टर कुमारी प्रेमा अनंत देशपांडे, एल्‌. सी. पी. एस्‌., हिच्याशीं माझें असें कोणतेंच नातें किंवा संबंध नाहीं, जेणेंकरून तिच्याशीं होणारा माझा विवाह बेकायदेशीर ठरावा ' (प्रेमाकडे पहात) बरोबर आहे ना ? (हंसतो) 'मला हें माहीत आहे कीं हीं विधानें खोटी ठरलीं तर मला कैद व दंडाची शिक्षा होऊं शकते.'—जणूं काय लग्नाची जन्मठेप म्हणजे शिक्षा नव्हेच !

**उपाध्ये** :– (हंसत) बरं, आतां खालीं सही करा. (भालेराव सही करतो. नंतर प्रेमाला) आतां आपण हा खालचा मजकूर वाचा.

**प्रेमा** :– ( उभी होऊन) मी आपली इंग्रजींतच वाचतें ! (वाचते ) " I, Kumari Prema, daughter of Anant Malhar alias Acharya Bhausaheb Deshpande, M. L. A., declare as follows :– I am at the present moment unmarried. I profess the Hindu religion. I have completed my age of twenty-one years—

**भाले०** :– (गुणगुणतो) वाढली उंच ही किती ... !

**प्रेमा** :– तूं चुप रहा रे बाळ्या ! ( वाचते ) I am not related to Balvant Ramchandra Bhalerao in any degree of consanguinity or affinity which would render marriage between us illegal–

**भाले०** :– अॅफिनिटीमुळें मॅरेज इल्लीगल होतं ?

**उपाध्ये** :– (प्रेमा पुन्हां चिडून पहाते. तिला हंसत) वाचा वाचा !

**प्रेमा** :– I am aware that, if any statement in this

declaration is false, I am liable to imprisonment and also to fine.

उपाध्ये : (हंसत) हं आतां खालीं सही करा. (प्रेमा सही करते.) आतां (भालेरावला) आपण म्हणा, (भालेराव त्याप्रमाणें म्हणतो) 'मी, बळवंत रामचंद्र भालेराव कुमारी प्रेमा अनंत देशपांडे हिचा माझी कायदेशीर पत्नी म्हणून स्वीकार करतों.' आतां आपण (प्रेमाला) म्हणा, (प्रेमा म्हणते) 'मी, कुमारी प्रेमा अनंत देशपांडे श्री. बळवंत रामचंद्र भालेराव यांचा, माझा कायदेशीर पति म्हणून स्वीकार करतें.' आतां या लग्नाचं शुभचिन्ह म्हणून एकमेकाला एखादी वस्तु द्या—हार घाला.

( भालेराव प्रेमाच्या गळयांत मंगळसूत्र घालतो. प्रेमा त्याच्या बोटांत आपली आंगठी घालते. दोघें एकमेकांला हार घालतात. उपाध्ये सिगरेटच्या डब्यांतून अक्षता काढून दोघांवर उधळतात. सर्व लोक टाळया वाजवतात.)

कोरके :–( एकदम उठून सिगरेटच्या डब्यांतील अक्षता सगळयांना वाटून वधुवरांवर उधळीत ) शुभ मंगल सावधान ! (सगळे 'री' ओढतात आणि अक्षता उधळतात व पुन्हां टाळया वाजवतात.)

उपाध्ये :–आतां साक्षीदार !

भाऊ० :–द्या शेठजी ! (रतीलाल आणि मगनभाई फॉर्मवर आणि रजिस्टरवर सहृया करतात. त्या वेळीं कोरकेला) कोरके, तूं आलाच आहेस तर तूंच कर तिसरा साक्षीदार म्हणून सही—नाहीं तर मीच करणार होतों. ( कोरके सहृया करतो. ) प्रेमा !–भालेराव ! दोघेंहि देवांना, बापूंना नमस्कार करा अन् त्यांचे आशीर्वाद मागा ! (दोघें देवांना आणि गांधीजींच्या फोटोला फुलें वाहून नमस्कार करतात. प्रेमा हळद—कुंकू वहाते. त्यानंतर दोघें भाऊसाहेबांना नमस्कार करतात.) सुखानीं नांदा बरं ! ( नंतर दोघें इतर मंडळींना नमस्कार करतात व गळयांतील हार काढून ठेवतात. )

उपाध्ये :–(तोंपर्यंत रजिस्टर व सर्टिफिकेटवर सही करून सील ठोकतात. सर्टिफिकेट भालेरावला देत ) हं, हें घ्या आपलं सर्टिफिकेट !

भाले०:– ( तें घेत ) थँक्यू सो मच् !

उपाध्ये :– चपरासी ! (चपरासी येऊन बस्ता बांधूं लागतो )

भाऊ०:– प्रेमा, सर्व मंडळींचं तोंड गोड करा आतां !

( प्रेमा आणि पैकू घरांत जातात )

रती० :- साहेबांनीं सर्व साहित्य जवळ ठेवलं आहे ! हः हः हः ! रजिस्टर लग्नांत अक्षतांची गरज असते वाटतं ?

उपाध्ये :- छे छे ! अक्षतांची कायद्यानी मुळींच गरज नाहीं.

भाले० :-(मधेंच)तरी पण असं आहे- टाकल्या थोडया अक्षता तर बिघडतं कुठं ! तसंच, देव असलाच तर त्यालाहि साक्षीला हजर ठेवलेलं बरं !- त्याशिवाय तुमची साक्ष आहेच-सील आहे-साहेबांची सही आहे- ( प्रेमा आणि पैकू चहाचीं व पेढयांचीं तबकें घेऊन येतात. आणि चहाचे कप व पेढे चपराशासकट सगळयांना वाटतात.) कसलीच पळवाट म्हणून राहूं नये अशी शक्य ती काळजी घेतलेली बरी !

उपाध्ये :-( हंसत ) खरं आहे ! ( त्यांचें लक्ष प्रथमच कोरके आणि विशेषत: शशीकडे जातें. तिला उद्देशून भाऊसाहेबांना ) आपली तारीफ ?

भाऊ० :-ही ? कोरकेची मुलगी शशिकला ! खरं म्हणजे यंदा एम्. ए. व्हायची ती !—फार बुद्धिमान् आहे, पण नोकरी करावी लागते बिचारीला -कोरकेंची नोकरी गेली-फार मोठा खटला आहे यांचा !

उपाध्ये :— ( आठवण करीत ) कोरके ?-कोरके म्हणजे ?-

भाले० :-( मधेंच ) हो हो, तेच हे ! आयडियल बँकनी नुकतीच केस केली नव्हती का ?-अपीलमधें सुटले ते !-हेच ते !

उपाध्ये :-( प्रकाश पडल्यासारखे ) आय् सी-आय् सी !

कोरके :- ( फाजील कृतज्ञता दर्शवीत ) खरं म्हणजे भाऊसाहेबांची मेहेरबानी !

भाऊ० :-माझी कसली मेहेरबानी ? ईश्वराची कृपा म्हण ! कोर्टानी नुसता निष्काळजीपणाचा शेरा मारून सोडला तुला ! (उपाध्येला) बँकेनें सिक्युरिटी मात्र जप्त केली !

भाले० :-आमच्या ऑफिसमधें लावून द्यायची खटपट करतों आहें मी-तसे मोठे अनुभवी अकाउन्टन्ट आहेत हे !

कोरके :-(लुब्रेपणा करीत) काय जाळायचा हो अनुभव ! जोखीम किती असते ! संभाळून घेणारा साहेब नसला तर अकाउन्टन्टसारखी वाईट नोकरी नाहीं !

( हें सारें संभाषण सर्व मंडळी पेढे खाऊन चहा पीत असतांना चालू असतें. चपरासी आपला कप बाहेर घेऊन गेलेला असतो तो रिकामा कप घेऊन परत येतो व पैकूला देतो. )

**भाऊ०**:–( चपराशाकडे पाहून ) प्रेमा ! चपराशाला चहा दिलास ना ?

**प्रेमा** :–दिला तर !

**उपाध्ये** :– ( चहा संपतांच पानदानांतील लवंग तोंडांत टाकून भाऊसाहेबांपुढें हात जोडून उभे होत ) बरं आहे, भाऊसाहेब, रजा घेतों आतां–एक स्पॉट इन्स्पेक्शन आहे– गेलं पाहिजे मला !

**भाऊ०**:– ( उठून नमस्कार करीत ) बरं आहे ! तसदी झाली आपल्याला !

**उपाध्ये** :– छे छे ! तसदी कसली त्यांत ! – खरं म्हणजे रजिस्ट्रारसाहेब परगांवीं गेले असल्यामुळें हें शुभलग्न लावायचा सुयोग लाभला मला ! – बर आहे. ( वाकून नमस्कार करून जातात. )

( त्यांच्या मागोमाग चपरासी, आणि उपाध्यांना पोंचवायला गेल्यासारखे, म्हणजे भाऊसाहेबांना नमस्कार न करतां, रतीलाल आणि मगनभाई बाहेर जातात. भालेराव व प्रेमा दरवाजापर्यंत जाऊन परततात. )

**कोरके** :– प्रेमाताई ! ( प्रेमा थबकून उभी होते व प्रश्नार्थक मुद्रेनें त्याच्याकडे पहाते) – आतां – ओळखलं नाहींस वाटतं ?

**प्रेमा** :– काय ओळखायचं ?

**कोरके** :– वा ? दुसरं काय ! – अग तोंड गोड झालं, डोळेसुद्धां गोड झाले – आतां एकदां आमचे कान गोड करा कीं ! – काय भाऊसाहेब ?

**भाऊ०**:– ( भावना दाटून आल्यासारखे ) प्रेमा – खरंच, म्हणतेस का ? – किती दिवसांत ऐकला नाहीं तो अभंग तुझ्या तोंडून–

**प्रेमा** :– नको भाऊ ! —मला आईची आठवण येते तो अभंग म्हणूं लागलं कीं – अन् मग म्हणवतच नाहीं मला ! ( डोळ्यांत अश्रु येतात. )

**भाऊ०** :– म्हण – म्हण ! सूर्याचे कर नि पावसाची सर एकत्रित होणं म्हणजे सुद्धां निसर्गाच्या सौंदर्यातला अनुपम सोहळाच असतो तो ! ( प्रेमा त्यांच्याकडे अगतिक झाल्यासारखी पहाते ) – म्हणा !

**प्रेमा —अवघाची संसार सुखाचा करीन। आनंदें भरीन तीन्ही लोक।
जाईन गे माये तया पंढरपुरा। भेटेन माहेरा सुखाचीया।
सर्व सुकृताचें फळ मी लाहीन। क्षेम मी देईन पांडुरंगीं।
बाप रखुमादेवीवर विठ्ठलाचे भेटीं। आपुलीये सेवेसाठीं करूनी ठेला।**

( सर्वजण ऐकत असतां रतीलाल आणि मगनभाई अनुक्रमें फळांचा पेटारा व गाठोडें दरवाजापाशीं ठेवून गुपचुप येऊन बसतात. गाणें संपल्यावर क्षणभर शांत असतें. )

**कोरके** :– (आपल्या खिशांतील छोटासा चांदीचा करंडा काढून) वा वा! छान ! छान ! – हं, शशी ! हें घे – प्रेमाला कुंकू लाव अन् दे हा तिला !

**शशी** :– ( प्रेमाला कुंकू लावून ) घ्या – प्रेमाताई !

**भाऊ०** :– हें काय ? हा आहेराचा कारभार करायला कोणी सांगतलं तुला ?– याच कारणासाठीं तर मी बोलावलं नाहीं कुणाला ! ( शांतपणें ) शशी, घेऊन जा बरं परत तो ! ( प्रेमा शशीचा हात लोटते. )

**कोरके** :– वा वा ! – शशी ! भाऊंचं काय ऐकतेस ! दे तो तिला !

**भाऊ०** :– ( शांतवृत्तीला साजेशी चीड आल्यासारखे ) कशाला दे ! याची गरज काय – अं ? त्यापेक्षां त्या करंड्याची किंमत एखाद्या गरिबाला नाहीं तर गांधीफंडाला देशील तर जास्त पुण्य लागेल तुला ! – शशी परत ने बेटा तो !

**कोरके** :– ( शशीजवळून करंडा घेऊन प्रेमाच्या हातांत जबरदस्तीनं ठेवीत ) हें पहा भाऊ ! तुमचा हा तऱ्हेवाइकपणा मुळींच आवडत नाहीं मला ! चांगलं सौभाग्य लाभलं आहे तुमच्या एकुलत्या एका मुलीला – अन् सौभाग्याचंच लेणं देतों आहोंत ना आम्ही ! – नाकारायला काय झालं ? केवढा अभद्रपणा होतो आहे हा, कांहीं कळतं का तुम्हाला ? हंः ! – मंगळसूत्र तरी कशाला घातलंत, भालेराव, तिच्या गळ्यांत तुम्ही !

**भाऊ०** :– अरे पण ज्यांनीं मंगळसूत्र घातलं तेच तिला कुंकू द्यायला समर्थ नाहींत का ? ( आपलें तर्कशुद्ध भाषण आवडून किंचित् हंसतात )

**कोरके** :– असं ! – मग नेऊं हें परत ? प्रेमा, तुलासुद्धां चालतो ना हा अभद्रपणा ?– ठीक आहे ! ( परत फिरतो )

प्रेमा :– खरंच, भाऊ – कुंकवाला नाहीं म्हणणं कसंसंच वाटतं !

भाऊ० :– अग कुंकवाला का नाहीं म्हणतों आहे मी ? घे बरं – कुंकू घे काढून त्या करंड्यांतलं – करंडा मात्र परत दे ! ( कोरकेला ) आतां झालं ना समाधान तुझं ?

कोरके :– ( हट्टाला पेटल्यासारखा ) कांहीं द्यायचं नाही मला ! — चला ! शशी ! पाहिलास प्रीतिविवाह ! ( उठून उभा होतो ) जाऊं या !

भाऊ० :–( समजूत घालीत ) अरे असा चिडतोस काय ? पण बाबा ! ही आहेराची प्रथा म्हणजे अलीकडे जुलूम होत चालला आहे – ज्यांना ती परवडत नाहीं त्यांच्यावरसुद्धां तिचं ओझं रूढीमुळं लादलं जातं – ही असली प्रथा स्वत: उदाहरण घालून आपण मोडायला हवी !

कोरके :– मोडा ! सगळ्या प्रथा मोडा ! – अन् त्या कुंकवाचासुद्धां एक पैसा द्या मला ! – तें तरी कां म्हणून फुकट घेतां ? आण, प्रेमा ! एक पैसा पडला आहे मला त्या कुंकवासाठीं ! टाका तो !

भाले० :– दे प्रेमा ! ( हंसत ) देऊन टाक एक पैसा ! – हो, पण तो पैसा देतांना नीट तपासून घे मात्र ! – नाहीं तर, तुमच्या शेतीवर काम करणाऱ्या, एखाद्या किसानाच्या, निढळाच्या घामाचे डाग असायचे त्या पैशावर ! दुसऱ्याच्या घामाचा एक पैसासुद्धां घेण्याची प्रथा – ती देखील, मला वाटतं, आपण मोडायला हवी.

भाऊ० :–(थोड्या आपुलकीच्या थट्टेनें) तुमच्या पुढं बोलायची प्राज्ञाच नाहीं कोणाची. तुम्हांला माणसांमाणसांतली तडजोड मान्यच नाहीं मुळीं ! तुमच्या मतें माणसांनीं सारे मैत्रीचे संबंध तोडून उपाशी मेलं तरी पाहिजे, नाहीं तर संग्रहापायीं जितकं खातां येईल तितकं खातच सुटलं पाहिजे – मग त्याच्या विशाल उदरांत सारीं मानवी मूल्यं गडप झालीं तरी चालतील तुम्हांला..

भाले० :– आपल्या समाजांत मैत्री – अन् मानवी मूल्यांची तडजोड ? अहो, इथं प्रत्येकाची तडजोडीची मर्यादा त्याच्या पाठीशीं असलेल्या इस्टेटीच्या मूल्यावर ठरते हें तुम्हांला माहित नाहीं वाटतं ? कुठलीं मानवी मूल्यं अन् मैत्री ? उकिरडा उकरून पोट भरायचे ज्यांच्यावर प्रसंग येतात त्यांना शेजारच्या कुत्र्याशींसुद्धां मैत्री अन् तडजोड परवडत नाहीं ! ज्या

समाजांत श्रम करायला तयार असून माणसाला काम मिळत नाहीं – काम मिळालं तर पोटभर दाम मिळत नाहीं – आज मिळालं तरी उद्यांची शाश्वति नाहीं – त्या समाजांत प्रत्येकानं सापडेल त्या साधनांनीं होईल तितका धनसंग्रह तरी केला पाहिजे – नाहीं तर मग शुद्ध साधनाची धाबळी नेसून उपोषणानं प्राण जायची वाट पहात बसलं पाहिजे ! तुम्हांला जर तडजोड चालते तर मग बिचाऱ्या कोरकेशींच कां नाही करत ती ! – एवढासा करंडा तो काय, अन् त्याच्यासाठीं एवढा वैचारिक संग्राम तो कशाला !

**भाऊ०** :– ( हार खाल्ल्यासारखे हंसून ) कोरके ! – तुम्हांला वकील मात्र छान मिळाला हं ! देऊन टाका ! प्रेमा, घे तो ! – या निमित्तानं तरी त्याच्या हृदयांतला परमेश्वर आज जागृत झाला, नशीब म्हणतों मी ! – जन्मभर उडाणटप्पूसारखा वागत आलास – आज कुठून सुचला तुला हा शिष्टाचार ! तुझ्या शुद्ध हेतूचा मान राखायलाच हवा ! घे तो प्रेमा !

**कोरके** :–( प्रेमाला करंडा देत ) सुटलों बाबा एकदांचा !

**भाले०** :–पण कोरके, तुमचा हेतु खरंच शुद्ध आहे ना ! आपल्याजवळ तरी तें ओळखायची कसोटी नाहीं !

**भाऊ०** :– (मनापासून हंसत) आतां आणखी बुद्धिभेद कशाला करतां त्याचा ! प्रेमा ! कोणाशीं लग्न केलं आहेस तें ओळखतेस ना ?

**प्रेमा** :–(करंड्यांतील कुंकू कपाळाला लावीत) चांगली ओळखते मी त्याला !

**कोरके** :–का ग ! आतांसुद्धां तू त्यांना अरेतुरेच करणार का ग ? – आता तुझे पति आहेत ते ! लहानपणची गोष्ट वेगळी होती !

**भाले०** :–(खोटचा दरडावणीनें) ए प्रेमा ! आतां आम्हीं तुझे पति आहोंत! 'आम्ही' म्हणजे – मीच एकटा हं – आदरार्थे बहुवचन ! हें नवं व्याकरण शीक थोडं ! (वांकुल्या दाखवीत) तिकडून म्हणायचं झालं ! – हा कोणचा प्रयोग झाला शशी ? [ भावनाकर्तरि कीं निरर्थवाचक भाषाप्रयोग – ]

**प्रेमा** :– पुरे रे पांडित्य तुझं ! फाजिल कुठला !

(सर्वजण हंसतात)

**रती०** :-(हा विनोद चालू असतां, दरवाजापाशीं ठेवलेला, वरपर्यंत फळांनी भरलेला पेटारा उचलून भाऊसाहेबांपुढें ठेकीत) भाऊसाहेब आपल्याला राग तर येणार नाहीं ना ? लहानशी सेवा आहे माझ्या हातची – तिचा स्वीकार झाला पाहिजे ! (हात जोडतात)

**भाऊ०** :- (विनयपूर्वक) आतां आपण हल्ला चढवलात ! – छान ! – खरं म्हणजे आम्हीच आपल्याला साक्षीदार म्हणून भत्ता द्यायला हवा होता ! (हंसतात) त्याच्या उलट आपणच हें उपकाराचं ओझं लादतां ! – फळं आहेत म्हणून वरं ! नाहीं तर मोठंच संकट ओढवलं असत, आपल्याशीं टक्कर घ्यायचं !

**रती०** :–त्यांत संकट कसलं भाऊसाहेब ! आपली सेवा करायचा मौकाच कधीं मिळतो आम्हाला ! – आपल्या लोकसेवेच्या व्रताच्या मानानी हें म्हणजे – हः हः हः ! – हें म्हणजे –

**भाले०** :-पैकू ! जा रे ! सुरी अन् प्लेट्स् घेऊन ये बरं ! – काय शशी ! तुला आवडतात की नाहीं सफरचंद ? ( शशी वर्तमानपत्राच्या मागें तोंड लपवते) – अग, फळांना विटाळ नसतो !

(पैकू आंत जातो)

**भाऊ०** :–अगदीं बरोबर आहे तें ! फळच काय, पण पोटासाठीं दिलेलं अन् पोटासाठीं घेतलेलं दान – मग तें देणारा अन् घेणारा कोणीहि असो, कसाहि भलाबुरा असो — पोटाला दिलेलं दान नेहमीं सत्पात्रीं दानच होत असतं !

**भाले०** :- (हंसत) म्हणजे, या न्यायानी, गाडाभर अन्न खाणाऱ्या बकासुराचं पोट म्हणजे आदर्श पात्रच ठरत असेल !

**भाऊ०**:–( ·आपुलकींतील उपरोधानें)तुमच्या बुद्धीची चौकट फार मोठी आहे ! – कोणचंहि चित्र तिच्यांत एन्लार्ज करूनच बसवावं लागतं, नाही !

**भाले०** :—पण एन्लार्जमेंटमधेंच तर मूळ चित्रांतले सूक्ष्म दोषहि स्पष्ट होतात !

**मगन०** :-(हा वाद चालू असतां दरवाजाजवळ ठेवलेलें गाठोडें उचलून आणतात आणि वरच्या कपड्याची गांठ सोडून, एका तबकांत ठेवलेला

खड्यांचा लहान डबा भालेरावला व मोठा प्रेमाला देत) घ्या साहेब ! घ्या प्रेमाताई !

**भाऊ०** :-मगनभाई ! काय आहे तें ?

**मगन०** :- (हात जोडून) हें - हें आमच्या मुलीसाठीं आणखी जांवई-बुवासाठीं लहानशी भेट आहे - दुसरं कांहीं नाही ! - आपल्याला ठाऊकच आहे, मला मूल बाळ कांहीं नाही - कन्यादानाच पुण्य माझ्या नशिबांतच नाहीं -या निमित्तानं तरी तें लागूं द्या. (हात जोडतात)

**भाऊ०**:-पण त्या डब्यांत काय आहे ? ( अधीरपणें ) उगीच भलभलते अलंकार अन् उपमा -[ देऊन भलत्या गोष्टीचं समर्थन - ]

**भाले०**:-(आपला डबा उघडून ) हा सिगरेटचा डबा अन् ही सिगरेट केस ! -दोन्ही पोटाङ जाणाऱ्या धुरासाठीच आहेत ! वा शेठजी ! अगदीं सत्पात्री दान झालं ! थँक्स् हं !

**प्रेमा** :- (आपला डबा उघडते. त्यांत सोन्याचा कंबरपट्टा असतो. तो पाहून दचकल्यासारखी) अगबाई, हें काय हें ? हा पाहिलात का भाऊ सोन्याचा कंबरपट्टा !

**भाऊ०**:-(एकदम उसळून) सोन्याचा कंबरपट्टा ! शेठजी !—

**भाले०** :- तो सुद्धां तिच्या पोटासाठींच आहे, भाऊसाहेब ! शेठजी, तुम्ही अगदी कमाल केलीत ! - खरंच, कोणाच्या पोटाला काय कसं द्यावं, याचं धोरण आपल्या व्यापारी बधूपासूनच शिकावं !

**कोरके** :- म्हणूनच, मला वाटतं, या पुण्याचं फळ, चक्रवाढ व्याजासह देव त्यांना मोठ्ठं पोट देऊन करतो ! - नाही तर आमचं पोट पहा !

**भाऊ०** :- (आतां ते आंतल्या आंत चिडल्यासारखे दिसतात) काय थट्टा आरंभली आहे तुम्ही सगळयांनीं मिळून ! (उठून उभे होतात)

**मगन०**:-(हात जोडून) पण भाऊसाहेब ! आपण कोरकेंचा ईश्वर तेवढा मानला ! - आणि माझ्या ईश्वरानी कांहीं पाप केलं म्हणून का एवढी खपा मर्जी झाली आपली ! ( भाऊसाहेब निरुत्तर झाल्यासारखे मट्कन् बसतात ) ज्यानं त्यानं आपापल्या ऐपतीप्रमाणं ईश्वराला नैवेद्य दाखवला पाहिजे भाऊसाहेब ! - भाऊसाहेब, आपल्याला राग आला का ? - आपलं मन दुख-वण्याचा हेतु नव्हता माझा भाऊसाहेब ! -माफ करा !

**भाऊ०**:– ( थोडया स्तब्धतेनंतर ) त्याचंच वाईट वाटतं आहे मला ! – द्यायला नको तरी राग आला मला ! – आपणच मला क्षमा करा !

**मगन०** :– फूल नाहीं फुलाची पाकळी वाहून लक्ष्मी – नारायणाच्या जोडयाची पूजा करायला मिळाली मला – ( प्रेमाच्या कंबरेभोंवती कंबरपट्टा बसवूं लागतो )

**प्रेमा** :– (संकोचून) हें काय हें शेठजी ? (भाऊसाहेबांकडे पाहूं लागते)

**मगन०** :– (आतां लोंचटपणें) पहा तर ! आता भाऊसाहेबांनी परवानगी दिली आहे ! – हॅं: हॅं: हॅं: ! (कबरपट्टा बसवून) पहा बर किती साजरी दिसती आहे आतां लक्ष्मी, भाऊसाहेब ! (भाऊसाहेब निश्वास सोडतात)

**भाले०** :– वा लक्षुम्बाई ! म्हटलं ‘ मम गृहे स्थिरा भव !’

**प्रेमा** :– ( मनाची गोंधळलेली स्थिति झांकण्यासाठीं चिडल्याची बतावणी करीत) तूं चुप् रहा रे बाळया ! – पहा हो भाऊ !

(पैकू सुरी व दोन–तीन प्लेट्स् घेऊन येतो )

**भाऊ०** :-(कष्टी होऊन) मी आंत जाऊन पडतों आतां !

**प्रेमा** :– थोडे थांबा ना भाऊ ! सफरचंद कापून देतें मी तुम्हांला !

**रती०** :– (एकाएकीं घाईंत असल्यासारखे) बरं आहे भाऊसाहेब, रजा घेतों आम्ही आतां — चलतां ना मगनभाई ? (हात जोडून उठतात )

**मगन०**:– चला, चला ! (हात जोडून) माफ करा ह – आपण आशीर्वाद द्यायला पाहिजे आम्हांला ! (तख्तपोसाला स्पर्श करतात )

**प्रेमा** :– पण थोडे थांबा ना शेठजी ! – यांतलीं थोडी फळं देतें चिरून – खाऊन जा थोडं.

**रती** ०:– हें काय भलतंच प्रेमाताई ! इतक्या थोडयाशा फळांत आमचा हिस्सा कशाला ! जयहिंद ! आम्हांला घाई आहे जरा – आपण घ्या ! – चला मगनभाई ! बरं आहे मंडळी ! जयहिंद !

(रतीलाल व मगनभाई जातात)

**प्रेमा** :– (कंबरपट्टा काढून ठेवीत) कांहीं तरीच केलं हें शेठजींनीं ! (भालेरावला) कशाला बोलावलंस रे त्यांना तूं ?

**कोरके** :– पण असं काय बिघडलं मोठंसं त्यांत ?

प्रेमा :–नाहीं तर काय ? ही कसली आहेराची पद्धत ? – तुमच्या करं-ड्याची गोष्ट निराळी होती ?

भाले० :– कांहीं निराळी नाहीं ! – ईश्वर सगळीकडे सारखाच ! जे आस्तिक आहेत त्यांना हं !

प्रेमा :– भाऊंना मुळींच आवडला नाहीं हा प्रकार !

भाले० :– सफरचंद काप आधीं त्यांतले ! – शशी नुसता तमाशा पहात बसली आहे मघांपासून ! पैकू, काढ बरं त्यातली फळं ! ( पैकू उद्योगाला लागतो )

पैकू :– (थोडे सफरचंद काढून) खालतं मोसंबीं आहेत जी :

प्रेमा :– तीं आत नेवून ठेव मग –

पैकू :– (आश्चर्यचकित होऊन ) आणखी हे का आहे जी खालतं ?

प्रेमा :– (पेटाऱ्याजवळ जाऊन) काय आहे ? (आंत पाहून) अं ? हें काय हे आणखी ? ( काढूं लागते. पैकूला ) खालून धर बरं. पेटारा – ( तो पेटारा धरतो. ती त्यांत घट्ट बसलेली पोलादी पेटी ओढून काढते. ) म्हणजे ! ( सगळेच थक्क होतात) हें पाहिलंत का भाऊ ! (भाऊसाहेब कावरे बावरे होऊन आपल्या जागेवरून पहातात. पेटीला किल्ली असते, ती लावून कुलूप उघडते. आंत नोटांची चळद असते ती पाहून दडपल्या-सारखी मागें सरते.) अरे बापरे ! भाऊ !

भाऊ० :– ( उठून जवळ जातात. नोटांचीं पुडकीं वेड्यासारखे बाहेर काढीत, नतर पुन्हां आंत कोंबून झांकण लावीत ) अरे हें काय आहे हें ! हें पाप आहे रे ! ही फसवणूक आहे माझी ! ( मोठयानें ) रतीलालजी! – आत्तांच्या आत्तां परत करा हें विष ! अरे पहातां काय नुसते ! भालेराव! ( स्वत: पेटी उचलून दरवाजाकडे जात ) रतीलालजी !

भाले० :– ( मधें पडून त्यांच्या हातून पेटी घेतो ) आणा इकडे ! मी करतों ती व्यवस्था ! ( पेटी बाजूला ठेवून कोचावर बसतो ) तुम्ही इतके एक्साइट कां होतां ?

भाऊ० :– ( असहायपणें ) तुम्ही या घरांत ठेवणार नाहीं ना हें विष ?

भाले० :– ( तुटकपणें ) नाहीं ! – प्रेमा ! चीर बरं तें सफरचंद !

भाऊ० :– आत्तांच्या आत्तां जा !

भाले०:–भाऊसाहेब, अशानी ब्लडप्रेशरचा पुन्हां त्रास होईल बरं !

भाऊ०:–( थकल्यासारखे ) प्रेमा, मला रस दे बरं थोडा. ( ती मोसंबीं घेऊन आंत जाते ) माझ्या पोटांत कालवायला लागलं आहे ! – शशी ! कोरके ! तुम्हांला पसंत आहे हा सारा प्रकार ?

कोरके :– आपल्याला तर बोलणंच सुचत नाहीं तुमच्यापुढं !

भाऊ० :– ( पिंजऱ्यांत कोंडल्यासारखे )— भालेराव !

भाले० :– थोडा वेळ शांत बसा भाऊसाहेब !

भाऊ० :– ( कडवटपणें ) पण हें धन ज्याचं त्याला परत मिळत नाहीं तोंपर्यंत कसा बसूं मी शांत ?

भाले०:–( अत्यंत तर्कशुद्ध भाषा बोलत असल्यासारखा) हें धन 'ज्याचं त्याला' परत मिळायला, मला वाटतं, बरींच वर्षं लागतील !

भाऊ०: – वर्षं !!

भाले०:– कित्ती तरी वर्षं लागतील या उठाठेवीला ! केवळ रतीलालच्या घरीं हीं पुडकीं परत गेलीं म्हणजे 'ज्याची त्याला' परत मिळाल्यासारखीं थोडींच होणार आहेत ! त्याच्या घरांत थोडंच पैदा झालं हें धन ! रामेश्वराचं पाणी काशीला अन् काशीचं पाणी गंगेच्या उगमाला म्हणजे हिमालयाला–परत करायचं, अन् तेंहि एका कावडीत भरून न्यायचं काम, बऱ्याच अवधीचं अन् मला एकट्याला तर मोठंच दगदगीच होईल तें ! – अन् मी एकटा किती पाणी नेणार ! त्यापेक्षां, रामेश्वरांतल्या पाण्याची वाफ होऊन निसर्गतःच तें आपोआप हिमालयांत परत जाईलच एक दिवस, हा विश्वास, मला वाटतं, जास्त शास्त्रशुद्ध होईल ! पाण्याच्या अशा अभिसरणाप्रमाणेंच करन्सीचं सर्क्युलेशन होत होत मिळेलच ती एक दिवस ज्याची त्याला ! – रतीलाल म्हणजे काय ! बोलून चालून अर्थ – गंगेच्या प्रवाहांतला एक डोह आहे तो ! त्या डोहांत हें धन नेऊन ओतलं म्हणजे त्याच्या उगमाला थोडंच मिळणार आहे तें ! काय शशी ! बी. ए. ला एकॉनॉमिक्स घेतलं होतंस ना तूं ? तूं एक शब्द बोलली नाहींस आल्यापासून ?

भाऊ० : – म्हणजे, तुम्ही आतां या घराचा डोह बनवणार आहांत ?

भाले० :– डोह ! छे छे ! मी तर डॅम बनवण्याच्या विचारांत आहें ! बांध घालून जास्तींत जास्त पाणी अडवायचं ! –आतां त्यामुळं थोडीं गांव-

खेडीं बुडतील हा भाग निराळा ! – पण आपलं सरकारसुद्धां गांवंखेडीं बुडवूनच डॅम्स् बांधणार आहे, नाहीं का ? पण त्या डॅम्स्चे फायदे किती होणार आहेत, पहा ना ! कालव्याचं पाणी शेतीला मिळेल ! – धान्याची पैदास वाढेल ! – विजेचं उत्पादन होईल ! – तिच्यावर नवनवे कारखाने उभे होतील ! – मालाची पैदास वाढेल ! – प्रवाहाच्या आंत मासे सापडतील ! – वरून बोटी चालतील ! – वा ! मला तर काव्याची स्फूर्ति व्हायला लागली आहे हें उज्ज्वल भविष्य पाहून ! —

**भाऊ०** : – तुमचं तें काव्य तुम्हांलाच लखलाभ होवो ! माझ्या नाका-तोंडांत पाणी जाऊन जीव गुद्मरायला लागला आहे माझा !

**भाले०** : – पण तुम्हीं दूर रहा ना त्या प्रवाहापासून ! कांठावर बसून तुम्ही आपल्या वैयक्तिक स्वातंत्र्याचं, मुक्तीचं चिंतन करा ! – जे उच्च विचार सुचतील ते आम्हांला सांगा ! – तुम्हीं तुमचं महत्कार्य करा – आम्ही आमचं करूं – अन् तुमचं नांव घेऊं ! आज नाही का – प्रत्येक गिरणीमालक, प्रत्येक बँकर, प्रत्येक पुढारी – सगळे आपापले उद्योग करताहेत, अन् गांधीजीं-चं नांव रोज सकाळसंध्याकाळ घेताहेत ! खरं म्हणजे गांधीजीचं नांव न घेतां भाषण करणारा वक्ता औषधाला नाही सापडत आज !

**कोरके** : – ( भाऊसाहेब खिन्न होऊन स्वस्थ बसले असतात त्यांना ) काय भाऊसाहेब ! ही घरजांवयाची सोयरीक मोठी गैरसोयीची होणार आहे तुम्हाला ! – भालेराव ! काय, विचार तरी काय आहे तुमचा ?

( प्रेमा रसाचा ग्लास घेऊन येते )

**भाऊ०** : – ( तिच्याकडे विमनस्कपणें पाहून ) प्रेमाची निवड आहे– तिचं ती पाहून घेईल ! ( रस पिऊं लागतात )

**प्रेमा** : – ( चोंहींकडे पाहून ) काय झालं ?

**भाले०** :– अग काव्य झालं आतांपर्यंत – आतां कार्याला लागलं पाहिजे !

**कोरके** :– भालेरावनी मोठमोठ्या योजना आखल्या आहेत आतांच्या आहेराच्या भांडवलावर !

**प्रेमा** : – मला नकोत त्या योजनाबिजना ! मला तर मघांपासून ही आहेराची भानगड सारखी जाचते आहे ! बाळ, हें सगळं परत करूं

या आपण ! अरे, सारा स्वाभिमान गुंडाळून हें सोनं अन् या नोटा ठेवून घ्यायची ही कसली रीत !

भाले० :– खुळी आहेस तूं ! आपण होऊन घरीं चालत आलेल्या लक्ष्मीला अशी पाठ देतास वाटतं कुणी ! बेपाऱ्याच्या हातचा सुटलेला पैसा – कपिलाषष्ठीचा योग समज !

प्रेमा :– पण आपल्याला काय भीक लागली आहे, त्यांनीं हें असं दान करायला अन् आपण तें ठेवून घ्यायला ?

भाले० :– लागली नाहीं तर काय ? तुला मोफत हॉस्पिटल काढायचं आहे ना गरिबांसाठीं ? त्याला फंड मिळाला असं समज ! फंडासाठी दारोदार भीक मागत हिंडावं लागलंच असतं कीं नाहीं तुला ! आपण या रकमेचा तसा उपयोग करूं !

प्रेमा : – एवढ्याशा रकमेवर हॉस्पिटल निघणार आहे !

भाले० :– हात्तिच्या ! अग ती रक्कम धंद्यांत गुंतवून वाढवूं ! पुरेशी वाढली म्हणजे मग हॉस्पिटल काढूं ! – टाटा-बिर्लांनीं काय केलं !

प्रेमा :– तुझा कांहीं नेम नाहीं ! – थापाड्या आहेस तूं !

भाले० :– ( पोलादी पेटी तिच्याजवळ देत ) ही ठेव – अन् आपल्या नांवावर जमा कर बँकेंत ! मग तर झाल ?

भाऊ० :– ( निश्वास सोडून उठतात ) बरं आहे, कोरके ! ( शशीची हनुवटी धरून ) शशी, विश्रांति घेतों मी ! — किती अबोल आहेस ग तूं ! प्रेमा, दोघांना जेवायलाच ठेऊन घे ना ! फार उशीर झाला—भुका लागल्या असतील यांना— (आपल्या खोलीत जातात )

प्रेमा : – खरंच, शशी, बारा वाजायला आले, इथंच जेवा ना तुम्हीं. पैकू, जा बरं, चार ताटं वाढायला सांग पंडितला !

( पैकू जातो )

शशी :– नको गडे ! घरीं वाट पहात असतील भावंडं माझीं ! लांब का आहे घर ! जाऊं या, बाबा आतां ! ( उठून उभी होते )

भाले० :– मग हीं फळं तरी घेऊन जा थोडीं ! – पैकू ! ( पैकू येतो ) अरे एक पिशवी घेऊन ये बरं आंतून—( पैकू जातो )

शशी :– ( कोरकेकडे पहात ) कशाला पण ? ( अधीर होते )

**भाले०** :– अग फळाला विटाळ नसतो हें शास्त्रवचन ऐकलंस ना आत्तां ?

**कोरके** : बर चला आणा ! ( पैकू पिशवी घेऊन येतो )

**भाले०** :– (चार पांच सफरचंद पिशवीत टाकून )दे तुझ्या भावंडांना !

**शशी** :– ( पिशवी हातांत घेऊन ) बरं प्रेमाताई ! कॉंग्रॅच्युलेशन्स ! बरं आहे सर ! हॅपी मॅरेज ! ( हंसून ) बरोबर आहे ना ? कीं निराळंच कांहीं म्हणायचं असतं ?

**भाले०** :– ते तुझ्या लग्नाच्या प्रसंगीं म्हणेन मी !

**कोरके** :– अच्छा ! कॉंग्रॅच्युलेशन्स ! ( जाता जातां )पण भालेराव ! जरा बेतानी हो ! तुम्हीं अगदीच बेछूट आहांत ! या शान्तिनिवासांत भाऊसाहेबांशीं कलह नका करू उगीचच्या उगीच! पुण्यात्मा आहे बिचारा!

**शशी** :– ( जाता जाता ) त्याची नको काळजी ! टाळी दोन चापट्यांचीच वाजते ना ! (मिस्किलपणें हंसत) भाऊसाहेबांच्या ‘ झांकल्या मुठी’-वर याच्या चापटीचा फटका नाही वाजायचा ! (हंसते)

**भाले०** :– (स्तभित होऊन) ऑं—! अग पोरी ! चांगलीच तिखट आहेस की तू ! भाऊसाहेबांची ‘ झांकली मूठ ’— अन् माझी चापटी काय ? काय कोरके ! तुम्ही या मिरचीचा तिखटपणा अनुभवलेला दिसत नाहीं अजून ! (शशीला) अग, हे तुला काल अजागळ म्हणत होते !—खरं कीं नाहीं प्रेमा ? (दोघी हसतात)

**कोरके** :– ( थट्टेने ) शशी ! आतां एकदम चल बरं घरीं !—आतां यांना आपल्या घरात कली पेटवायची स्फूर्ति झालेली दिसते आहे !—चल, चल लौकर !

**शशी** :–( हंसत ) बरं येतें हं !–नमस्कार !

( कोरके व शशी जातात. त्यांना दारापर्यंत पोंचवून प्रेमा आणि भालेराव परततात. पैकू उभाच असतो )

**पैकू** :–( प्रेमळ धीटपणा करीत ) झालं का जी लगन इतक्यांत ?

**प्रेमा** :–(खोट्या रागानें) लग्न नाहीं तर काय झालं इतका वेळ !

**पैकू** :–अजी, नाहीं हरद, नाहीं शेवती !— मंत्रभी त तुम्ही इंग्रजींत म्हटले! आतां कांहीं वरातगिरात जी ?

**प्रेमा** :–(दरडावण्याचें सोंग करीत) तुझीच काढतें आतां वरात ! शिष्ट! आंत जाऊन जेवायची तयारी कर आधी !

( पैकू हंसत हंसत घरांत जातो)

**भाले**०:– (सुटकेचा निश्वास सोडून प्रेमाकडे मिस्किलपणें पहात) सो ! — अखेर आपण नवरा-बायको झालों अं ? – हाउ फनी ! ( तो तिच्याजवळ जाऊ लागतांच, यापूर्वी न अनुभवलेल्या मन.स्थितीमुळें गोंधळल्यासारखी दूर होऊन ती सोफाचेअरवर बसते आणि तोंड झांकून घेते. त्याला हें वागणें जरा निराळेंच वाटून तो थबकतो. तिचें वागणें तिलाच चमत्कारिक वाटून लगेच ती त्याच्याकडे पहाते आणि पुन्हां आपलें तोंड झाकून घेते. त्या क्षणीच तिला हुंदका येतो. हा न उमगणारा प्रकार समजून घेण्यासाठी तो तिच्या सोफाचेअरच्या हातावर जाऊन बसतो. यामुळे तर तिचे हुंदके अनावर होतात ) हें काय हें नवीन, अं ? विचित्रच घडण असते म्हणायची बायकांच्या मनाची ! हुं: ! एका क्षणांत हा काय भलताच बदल ! ( तिला अधिक हुंदके येतात )– अरे ! म्हणजे लग्न झाल यांत रडण्यासारख काय झालं ?–प्रेमा ! ए रडूं नकोस बुवा अशी ! हें भलतंच कोडं सोडवायला लावूं नकोस ! ( तिला हलवून ) प्रेमा !– व्हॉट्स् दिस ! ( दरवाज्यांत 'पोस्टमन' असा आवाज होतो. तत्क्षणींच ती शुद्धीवर आल्यासारखी डोळे पुसूं लागते. भालेराव 'यस्' म्हणून दरवाजाकडे वळून, पोस्टमनजवळून डांकेचा गठ्ठा घेतो. परतल्यानंतर तिच्यांत झालेला बदल पाहून )– अस्सं ! म्हणजे तुला माझ्याऐवजीं पोस्टमन हवा होता होय तुझी समजूत घालायला ?

**प्रेमा** :- ( त्याच्या हातांतील डांकेचा गठ्ठा हिसकण्याचा प्रयत्न करीत ) ए नको ना रे छळूस असा !

**भालें**० :— ( हात मागें घेऊन ) अन् तूं मला रडून छळत होतीस ती ! ( नंतर एकेका पत्रावरील पत्ते–मथळे मोठ्यानें वाचत बाजूला टाकतो ) पेप्सिन् !–पर्टुसिन् !–फॉ–स्फो–लि–थि–सिन् ! बाप रे ! केवढं मोठं सिन् !– आचार्य भाऊसाहेब देशपांडे !–संपलो सिन्स् !

**प्रेमा** :—( थोडी चिडल्यासारखी ) जन्मभर सगळ्या जगाची टिंगल करत रहा ! लहानमोठं कांहीं पाहूं नकोस !

**भाले०** :– डॉक्टर मिसेस प्रेमा भालेराव ! – अरे वा ! इतक्यांत तुझा बदललेला पत्ता जगजाहीर कसा झाला ? (तिला पत्र देतो) – हे अस्मादिक ! ( आपलें पत्र बाजूला काढून ठेवतो ) नव भारत ! स्वतंत्र भारत ! विशाल भारत ! ( घाईघाईनें ) तरुण भारत – महा भारत ! ( सगळीं वर्तमानपत्रें एका झटक्यांत खालीं टाकून आपलें पत्र एका क्षणांत वाचून टाकतो. नंतर तिचें लक्ष नसताना तिच्या पाठीमागून चोरून तिचें पत्र वाचतो ) कोणाचं आहे हें ? – वर ताई, अन् खाली भाई ! ( हंसत ) म्हणजे मधें कांहीच्या बाहीं असेल !

**प्रेमा** :— (पत्र लपवून) ए, शट् अप् ! (थोडी चिडल्यासारखी दिसते)

**भाले०** :—( मिळते घेत ) आयॅम् सॉरी ! विशेष सीरियस आहे वाटतं !

**प्रेमा** :— ( कांगावखोर तुटकपणें )– हो !

**भाले०** :– कोणाचं आहे तें ?–म्हणजे तुझी हरकत नसेल तर हं !

**प्रेमा** :– ( त्याच तोऱ्यांत )– आहे माझ्या एका मित्राचं !

**भाले०** : – तें खर, पण कोण तो ? एखाद्या साक्षीदारासारखं काय बोलते आहेस अगदीं ! (हंसतो)

**प्रेमा** :— ( शून्यांत पहात ) बेचाळिसच्या चळवळीत ओळख झाली होती त्याच्याशीं माझी !

**भाले०** :– पण त्याला कसं कळलं तुझं लग्न होणार – माझ्याशीं होणार – अन् नेमकं आजच पत्र आलं त्याचं ?

**प्रेमा** :—(पत्रावरील स्टँप पाहून ) म्हणजे ! हें तर इथंच पोस्ट केलेलं दिसतंय ! हा इथं कधी आला ?

**भाले०** :– हें पहा – तूं नामाचा एकदांहि उच्चार केला नाहींस ! — सर्वनामं मात्र सगळीं वापरते आहेस ! हूं :! दिसिज् बॅड ग्रॅमर ! – अग याचं नाम तर सांग !

**प्रेमा** :–( उचंबळणाऱ्या भावना दाबीत ) शान्ताराम – सबनीस !

**भाले०** :– ( विचार करीत आश्चर्यानें ) शांताराम – सबनीस ?— म्हणजे! – म्हणजे आमच्या खात्यांत नुकताच आलेला टेक्नीशियन् !— अत्तांच आठ दिवसांपूर्वी कलकत्त्याहून बदलून आला तो ! अच्छा !

**प्रेमा** :–( स्तंभित होऊन ) खरंच कीं काय ? तरीच – तरीच कळलं हं त्याला आपल्या लग्नाचं ! काय चमत्कार पहा !

**भाले०** :– पण तुला ठाऊक नाहीं–– कलकत्त्यांत ट्रेड यूनियन चळवळी करत होता म्हणून हांकलला आहे त्याला तिथून ! फार डेंजरस माणूस आहे म्हणतात तो ! त्याचं सर्व्हिस बुक तर वा ! अगदीं नमुनेदार आहे ! तूं संभाळून रहा हं ! कारण तो माझ्या हाताखालीं काम करतो आहे ! नाहींतर उगीच कॉम्प्लिकेशन्स !

**प्रेमा** :–( मनापासून वाईट वाटल्यासारखी ) ए नको रे असं कांहीं बोलूंस त्याच्याबद्दल ! अतिशय सरळ – अतिशय भावनाशील माणूस आहे तो !

**भाले०** :–म्हणजे जास्तच डेंजरस् ! काय, म्हणतो काय तो ? (हात पुढे करून) पाहूं बरं त्याची तुझ्यासंबंधीं आजची 'भावना' ! (ती शून्यांत पहात असते तरी तो हात पुढेंच करून उभा असतो. अखेर ती नाइलाजानें त्याच्या हातावर पत्र टाकते. तें झर्कन् वाचून ) हं:! जवळजवळ प्रणय-पत्रिकाच आहे ही ! हो, म्हणजे मुद्याची गोष्ट सोडून बाकी सगळं कांहीं लिहिलं आहे त्यांनीं ! तूं लग्नच करायला हवं होतंस त्याच्याशी !

**पैकू** :– (ती चिडून बोलणार तोंच प्रवेश करून ) पानं मांडले बाई !

**प्रेमा** :– ( आलेली चीड गिळून ) बरं जा, आलोच ! (तो जातो) तूं इतका हलकट आहेस ! दुष्ट कुठला ! तुला मत्सर वाटायला लागला वाटतं त्याचा तेवढयाशा पत्रानी !

**भाले०** :– ( एकदम पवित्रा बदलवून खेळीमेळीच्या स्वरांत ) हात्तुझी ! कांहीं थट्टाबिट्टा कांहींच कसं कळत नाहीं तुला ! हं, चला उठा ! जवायचं नाहीं वाटतं आतां ?

( ती जड अंत:करणानें शून्यांत पहात उठते. अशा वेळीं —)

[पडदा]

# अंक दुसरा :

( शान्तारामची खोली. एका मोठ्या गॅलरीवजा हॉलमधें पार्टीशन टाकून डाव्या कोपऱ्यांत छोटी खोली काढली आहे. उजव्या भितीला दोन्ही टोंकाना एकेक दरवाजा आहे. अलीकडचा दरवाजा न्हाणीघराचा आणि पलीकडचा वर येण्याच्या जिन्याचा. डाव्या भितीला जोडून बसवलेल्या पार्टीशनच्या समोर असलेल्या जागेंत एक तख्तपोस व भितीला टेंकून पुस्तकांचें फडताळ आहे. तख्तपोसावर गादीचा एक गुंडाळा आणि सतरंजी. भितीवर फडताळाच्यावर वाचण्यासाठी विजेचा दिवा बसवला आहे. उजव्या भितीच्या आणि डाव्या पार्टीशनच्यामधें पलीकडे एक कठडा आहे. कठड्याच्या पलीकडे आकाश. कठड्याच्या वर कपडे वाळत घालण्याची दोरी आहे. उजव्या भितीच्या दोन दरवाजांच्या मधें एक जुनाट टेबल व खुर्ची आहे. वरच्या बाजूला आरशाचें जुनाटसें कॅबिनेट. टेबलावर आणि तख्तपोसावर पुस्तकें, वर्तमानपत्रें, लेखनसाहित्य अत्यंत अव्यवस्थितपणें पसरलें आहे. भितीवर पुढाऱ्यांचे फोटो आहेत.

पडदा वर जातो त्यावेळीं आपल्यासमोर कोणीच नसते, परंतु न्हाणीघरांतून बाईच्या गुणगुणण्याचा आवाज ऐकूं येत असतो. थोड्या वेळानें न्हाणीघरांतून शशी प्रवेश करते. ती आज सकाळीं न्हाली असावी. कारण केंसांभोंवतीं टॉवेल गुंडाळून त्याचा गुडाळा तिनें आपल्या डोक्यावर ठेवला असतो. तिच्या हातांत बादली आहे व बादलींत नुकतेच धुतलेले कपडे. तिचें पातळहि थोडेंसें भिजलें आहे. कठड्याच्या वरच्या दोरीवर ती एक पातळ, चोळी, परकर, ब्लाऊज आणि एक पैजामा वाळत घालते व गाणें म्हणत असते.

**शशी** :–*नव्या देशींच्या प्रवासा । दोन मुशाफिर जाती*
*आणि अचानक त्यांच्या । वाटा जुळूनिया येती*
*दोन नद्यांचे प्रवाह । होते धुंद झाले किती*
*लोकसागरा मिळाले । आली भरून भरती*
*दोन रेषांचें ग होतें । एक निराळें वळण*
*नकळत कैसें आलें । चित्र नवीन रंगून*
*दोन तारांचें कंपन । जुळलें ग एका सुरीं*
*दिशा भेदूनिया गेली । नवीन ही ललकारी*
*ललकारीच्या ह्या नव्या । ऐकूनिया ग सादाला*
*साथ देण्याबे येतील । देशादेशांतील बाला*
*नवें गीत ग ओठांत । नवा जोम ग हातांत*
*धरोनिया दावितील । नव्या संसाराची रीत*
*नव्या संसारांत नाहीं । मी-तूं-पणा उरलेला*
*सुखदु:खांत जगाच्या । पहा मिळोनिया गेला*

( कपडे वाळत टाकल्यानंतर रिकामी बादली घेऊन ती न्हाणीघरांत जाते. गाणें गुणगुणणें चालूच असते. थोडया वेळानें रिकाम्या हातांनीं ती बाहेर येते, आणि पुस्तकें, वर्तमानपत्रे वगैरे नीटनेटकी करते. पुन्हा गुणगुणत न्हाणीघरांत जाते आणि लगेच पाण्यानें अर्धवट भरलेली बादली घेऊन बाहेर येते. बादली घेऊन छोटया खोलीत जाणार तोंच जिन्यांत पावलांचा, संथ चालीचा आवाज ऐकूं येतो, म्हणून थोडी थबकून कानोसा घेते, खोलींत जाऊन बादली ठेवते आणि रिकाम्या हातांनीं बाहेर येऊन जिन्याचें दार उघडते. भाऊसाहेब प्रवेश करतात. त्यांच्या हातांत एक पिशवी आहे. त्यांना दम लागलेला दिसतो. )

**शशी** :- कोण भाऊसाहेब ! म्हणजे, तुम्ही कसे काय आलांत आज इथं ? ( भाऊसाहेब तिच्या खांद्यावर हात ठेवतात. त्यांना दम लागलेला पाहून ) किती दम लागला आहे तुम्हांला ! (दोघे तख्तपोसाकडे वळतात) आमच्या जिन्याच्या पायऱ्या भारीच अवघड आहेत ! बसा !

**भाऊ०** :– ( इकडे तिकडे पहात तख्तपोसावर आरामशीर बसून ) कुठं गेले आहेत सबनीस ?

**शशी** :– बाजारांत गेला आहे तो – पण येईलच इतक्यांत – आत्तांच नळ गेला – म्हणजे दहा वाजले असतील ! – कां कांहीं काम होतं वाटतं त्याच्याशी ? ( तरुतपोसाजवळ उभीच राहते. )

**भाऊ०** :– ( कठिण विषयाला सुरुवात कशी करावी या विचारांत वर्तमानपत्राची चाळवाचाळव करीत ) बस ना ! उभी कां ? – ( शशी खुर्ची आणून तरुतपोसाशेजारी ठेवते आणि फणी घेऊन केंस मोकळे सोडून विंचरत खुर्चीवर मोकळी बसते. तिच्याकडे वर्तमानपत्राच्या आडून मधेंच चोरून पहात ) किती दिवस झाले तुला इथं रहायला येऊन ?

**शशी** :– ( स्वतःचा बचाव करीत असल्यासारखी तुटकपणें ) झाला – आजच झाला एक आठवडा.

**भाऊ०** :– ( बेताबातानें ) फार धक्का बसला कोरकेला, तू घर सोडून इथं रहायला आलीस त्या दिवशी – ( ती स्तब्ध ) – अन् चार लोकाना तर टवाळीला चांगलाच विषय सापडला ! – फार वाईट वाटतंय त्यामुळं तुझ्या वडिलाना —

**शशी** :– अः ! — चालायचच !

**भाऊ०** :– ( पुढे चालू ) – हें अस एका तरुणाजवळ एकटं येऊन रहाणं – मलासुद्धा वाईट वाटल फार, त्याच !

**शशी** :– तुम्ही कशाला वाईट वाटून घेता उगीच ? (विषय बदलवीत) हल्ली प्रकृति कशी काय आहे तुमची ?

**भाऊ०** :– बरी आहे – पुष्कळच बरी आहे ! – डॉक्टरीणच आहे घरांत ! – ( पुन्हा मूळ पदावर ) घरीं परत कधी जाणार आहेस आतां ?

**शशी** :– परिस्थिति बदलल्याशिवाय नाहीं जायची !

**भाऊ०** :– कसली परिस्थिति ?

**शशी** :– ( जरा कडकपणें ) लाचलुचपत – पैशांची अफरातफर – काळा बाजार करण्याच्या संवयीची !

**भाऊ०** :– ( आश्चर्यचकित होऊन ) म्हणजे ! – तुझ्या घरांत कसली अफरातफर अन् काळा बाजार चालला आहे ?

**शशी** :– बाबांचे हात या पापांनीं आतां अगदीं बरबटले आहेत ! अतिशय चीड आहे मला असल्या गोष्टींची ! — यावरूनच तर भांडण झालं

माझं त्यांच्याशीं ! — अन् मी बोललें तर ते तर अगदीं चवताळून आले माझ्या अंगावर ! – मग कसं रहायचं त्या घरांत ?

**भाऊ०** :– असं ? कोरकेला ही सवय जडली आहे ? विश्वासच नाहीं बसत माझा !

**शशी** :– नाहींच बसायचा ! मागें बँकेंतल्या अफरातफरीच्या वेळीसुद्धां त्यांनीं असंच चकवलं होतं तुम्हांला ! — अन् म्हणून तुम्ही त्यांच्या वतीनं कोर्टाजवळ रदबदली केलीत ! तुम्हाला त्यांच्या मुलाबाळाचा, मोठ्या खट-ल्याचा कळवळा आला होता ना !

**भाऊ०** :– असं तिऱ्हाइतासारखं बोलूं नये आपल्या भावंडाबद्दल !

**शशी** :– त्यांचीं मुलं तींच माझीं भावंडं ना ! त्यांत कसला तिऱ्हाइत-पणा !

**भाऊ०** :– ( तिच्या उग्र स्वरूपामुळें चपापून )—अस्सं ! – पण त्याला हें ठाऊक आहे कीं या गोष्टीचं फार वाईट वाटेल मला ! तरीसुद्धां – [ तो या मार्गावर चालतो आहे ] ?

**शशी** :– ( झटक्यांत ) सांगितलं मी त्यांना तें ! पण लागलीच त्यांनीं तुमचाच एक लेख आधार म्हणून ऐकवला मला !

**भाऊ०** :– कसला लेख ?

**शशी** :– ( आठवून ) सेवावृत्ति आणि वात्सल्य — असाच कांहींसा लेख लिहिला आहे ना तुम्ही ?

**भाऊ०** :– हो – पण त्याला कसला आधार सांपडला त्यांत ?

**शशी** :– त्यांत तुम्ही लिहिलं आहे, मला वाटतं, की – गरिबांना न्याय मिळवून देण्यासाठीं – अन् त्यांच्यावरचीं संकटं दूर करण्यासाठीं – न्याय-निष्ठेऐवजीं बंधुभावानं प्रेरित होऊन केलेली सेवा – हीच खरी मानवसेवा होते — असंच कांहींसं लिहिलं आहे ना तुम्ही ?

**भाऊ०** :– अगदीं बरोबर ध्यानांत राहिलं तुझ्या ! ( तिची स्तुति कर-ण्याची संधि मिळाल्यामुळें ) किती बुद्धिवान आहेस तूं !

**शशी** :– ( त्या स्तुतीकडे दुर्लक्ष करून ) पण बाबांच्या दुर्बुद्धीला त्यांत जो अर्थ सांपडला, तो कळला तर उगीच लिहिला आपण तो लेख असं होईल तुम्हांला ! — ते म्हणाले, मीसुद्धां गरीबच आहें ! – एवढ्या कुटुं-

बाला माझा पगार पुरत नाहीं तर लांच खाऊं नको तर काय करूं मी !— तुम्हांला उपाशी मारूं ?— लांच खाल्ल्याबद्दल मी गुन्हेगार ठरलों अन् भाऊसाहेबांना वाटला माझ्याबद्दल बंधुभाव तर सोडवतील मला ते ! आज कितीतरी कॉंग्रेसवाले अन् मोठमोठे पुढारीसुद्धां काळा बाजार अन् लुचपत-खोरी करताहेत हें खुद्द कॉंग्रेसच्या अध्यक्षांनीं आतां कबूल केलं आहे म्हणाले ते !— मी म्हटलं ही काय तारीफ केली वाटत त्यांनीं काळया बाजा-राची !— तर ते म्हणतात, अध्यक्ष महाराजाना काय लागतं दुसऱ्यांना नांवं ठेवायला !— स्वत: बँकेचे, कपन्याचे, डायरेक्टर आहेत, फाउन्डर आहेत !— मला करा एखाद्या कंपनीचा डायरेक्टर – मग मीसुद्धां देईन – अगदी त्याच्यापेक्षांसुद्धा चागली व्याख्यानं देईन म्हणतात ते ! भाऊसाहेबाना लेख लिहायला काय लागत, म्हणतात ते ! घरी शेती आहे, एकुलती एक पोरगी आहे – ती कमवती आहे – तिचा नवरा कमवता आहे – तुमच्या लेखांचा कसा विपर्यास करतात हे, याची तुम्हाला कल्पना नाही !

**भाऊ०** :– (कष्टी होऊन) आहे, मला आहे कल्पना त्याची !— पण कोरकेनी मला हें कांहीच सागितलं नाही ! उलट तो तुझ्या चारित्र्यावर चिडल्यासारखा, तुझं मन वळवून तुला घरीं परत आणायला सांगत होता मला !

**शशी** :–( चिडून ) माझं चारित्र्य !— साऱ्या स्त्रीजातीचंच चारित्र्य, साऱ्या पुरुषजातीला कुचाळकी करायचा विषय होऊन बसला आहे ! यूमान् युग हेंच चाललं आहे ! सगळे बाप – सगळे भाऊ – नवरे अन् त्यांचे मित्र !— सगळे एकसारखे !— तरी बरं, एकेका बाईच्या मागें पुरुषांचे थवे लागतात तसे थवे नाही लावत बायका पुरुषासाठी !

**भाऊ०** :–म्हणूनच म्हणतों, तूं या इथ असं परपुरुषाकडे एकटं राहून कुचाळ-कीचा विषय व्हायचं नसतंस !— हेंच तुला सांगायला आलों आहें मी इथं !

**शशी** :— पण कुचाळकी करण्यासारखं असं काय केलं आहे मी ?

**भाऊ०** :– अशानी तुझं पावित्र्य एक दिवस नष्ट होईल ! अन् आजच्या कुचाळकीचं उद्यां समर्थन होईल ! त्यापेक्षां माझ्या घरीं आली असतीस— माझं घर तर तुला परकं नव्हतं ना !

**शशी** :- म्हणजे आम्ही नवराबायकोसारखे रहायला लागूं हेंच ना तुमचं म्हणणं ?

**भाऊ०**:-( धक्का बसून ) तें खरं – पण लग्न न करतां नवरा-बायको-सारखं रहाणं म्हणजे अनीतीला प्रोत्साहन देण होतं हें – [ विसरून कसं चालेल ! ]

**शशी** :- पण आम्ही लग्न केलं आहे असंच का समजत नाही तुम्ही ? माझ्या अन् शांतूच्या चार मित्राना घरीं बोलावून सागितलं आहे आम्ही !

**भाऊ०** :- पण लग्नाचा कसलाच कायदेशीर विधि न करतां ?

**शशी** :- मला हवा आहे तसला कायदेशीर विधि सापडला नाहीं अजून !

**भाऊ०** :- तोंपर्यंत तू अशीच रहाणार ?

**शशी** :— हो, अशीच रहाणार अन् साऱ्या जगाला सांगणार की तो माझा नवरा आहे अन् मी त्याची बायको आहे- आणखी काय हव ?

**भाऊ०** :- शशी ! फार मोठी जबाबदारी पत्करते आहेस वर तू ! -कल्पना आहे ना तुला ?

**शशी** :- तुम्हांला वाटते त्यापेक्षां मोठी जबाबदारी पत्करून आले आहें मी इथं ?

**भाऊ०**:-( घाबरल्यासारखे ) कसली जबाबदारी ? अं ?

**शशी** :- ज्या समाजांत प्रतिष्ठेच्या बळावर आपली पापं झांकून दुसऱ्याची कुचेष्टा करतां येते तो समाजच मोडायला आलें आहें मी इथं !

**भाऊ०** :- म्हणजे काय ?

**शशी** :-( आवेशानें ) ज्याच्या घरांत मी रहायला आले तो इष्काचं विष खाऊन मरायला टेंकलेला एखादा रोगी आहे असं वाटतं तुम्हांला ? —कीं कसं तरी करून तें विष एखाद्या भोळ्या पोरीच्या गळीं उतरवून तिला मारायला टपलेला भोगी आहे असं वाटतं ? – ' निर्व्याज प्रेमा 'ची निष्क्रियता, अन् त्यांतले शीतल शृंगार – असल काहीं नको आहे त्याला ! आज भांडवलामुळं चोंहींकडे माजलेल्या रानाविरुद्ध पेटलेला एक निखारा आहे तो ! पण म्हणूनच त्याच्यावर कोणी शितोडे उडवतात, त्याच्या उत्साहावर पाणी ओततात, त्याला झोडपून विझवण्याचा प्रयत्न

करतात ! अशा वेळीं, जळून पुरती राख होईपर्यंत त्याला पेटत ठेवणाऱ्या प्रेरक शक्तीची गरज वाटते त्याला ! ही एकच, असलीच सोबत हवी आहे त्याला ! मी इथं आलें ती करतां आली तर अशीच सोबत करायला आलें. पण उद्यां माझ्यांतली ही प्रेरक शक्ति नाहींशी झाली तर ? त्याच्या गळ्याभोंवती दीड मणाचा दगड होऊन बसणार कीं काय मी, अशी भीतीहि वाटते मला अजून ! तसं झालं तर त्याची महज अगदी मानानी सुटका होईल असा एखादा कायदेशीर विधि ठाऊक आहे का तुम्हांला ?– असेल, तर आज म्हणाल तो लग्नाचा विधि करायला तयार आहे मी !

**भाऊ०** :– ( तिच्या मनाचा पुरता ठाव घेण्यासाठीं ) शशी ! किती कडक भाषा बोलते आहेस तू !– नेहमी अबोल असणारी ! ही लढाई, ही धकाधकी तुला झेंपणार नाही वरं ! अग, अबलेच्या अंगी जें खरं बळ असत तें – मी माझ्या मनचं नाहीं सागत तुला – पण निदान गुरुदेव टागोराच्या शब्दात सागितलं तर तुझं खर उच्चस्थान तुला पटेल का ?

**शशी** :– ( अविश्वासानें ) कसल उच्चस्थान ?

**भाऊ०** :– गुरुदेवांनी आपल्या गार्डनरमधें असं म्हटलं आहे कीं, राजवैभवाचाहि गौरव वाढावा इतक सामर्थ्य तुझ्या एका हस्तस्पर्शात आहे !— तरीपण तूं मात्र आपले हात आपल्या झोपडीची झाडलोट करण्यांत झिजवतेस ! आणि म्हणूनच मी तुला माझं पूजास्थान मानतों !– पहा बरं, किती थोर मानलं आहे त्यानी तुझं स्थान !

**शशी** :– ( उपरोधानें हंसत ) तरुणपणीं आपल्या राजवैभवांत लोळतां लोळतां कल्पनेंतल्या झोंपडीची गोंडस मालकीण रंगवली आहे त्यांत ! इथं जिचं जीवन खुराड्यात राहून पार खुरटून जातं, ती जर नुसतं आपलं गाऱ्हाण सांगायला राज्यकर्त्यांच्या फाटकाजवळ गेली, तर लाठ्यांचा वर्षाव होतो तिच्या डोक्यावर !– फुलांचा वर्षाव नाहीं करत कोणी त्या 'पूजास्थाना'वर ! राजाची राणी फंडाची झोळी घेऊन दारोदार फिरली तरी राणी म्हणूनच तिला सगळे भीक घालतात !– अन् केरसुणीला ?– तिला अगदीं लक्ष्मी म्हटल तरी अखेर केरच काढावा लागतो ! (क्षणभर स्तब्धता)– पण मला राणीहि व्हायचं नाहीं नि केरसुणीहि व्हायचं नाहीं !– म्हणून तर, ज्याच्या सहवासांत राहून धाडस केलं तर आज नाहीं उद्यां

साऱ्या स्त्रीजातीलाच तिचं खरं स्थान प्राप्त होईल असा विश्वास वाटतो त्याच्या घरीं येऊन राहिलें मी !

**भाऊ०** :— ( हतबुद्ध होऊन ) मग ?— कोरकेला काय सांगू मी ?

**शशी** :— काय सुचेल तें सांगा !

**भाऊ०** :— ( अखेरचा प्रश्न सोडवून घेण्यासाठीं ) बरं पण, घरी पैसे तरी पाठवणार आहेस ना ?— हो, नाहीं तर स्वतंत्र राहून आपल्या पगारांत चैन करायची आहे – [ म्हणून घर सोडून आलीस असा भलताच अर्थ काढायचे लोक ! ]

**शशी** :– बाबांना !— आतां माझ्या दमड्यांची गरज ! आतां ते– भालेराव – रतीलाल – मगनभाई – ( ' या सगळ्यांना सोन्याची खाण सांपडली आहे ! ' असें कांहींतरी म्हणणार, तोंच जिन्यांत धाड्धाड् असा पायऱ्यांचा आवाज होतो, तो ऐकून ) – बरं झालं; शांतूच आला !— तोच सांगेल तुम्हांला सगळं कांही !— हें जिना चढणं पाहिल का त्याचं ! भूत आहे नुसतं ! ( दाराकडे वळते, तोंच शांताराम धाडकन् दरवाजा उघडून प्रवेश करतो )

**शान्तू** :– ( बाधा उंचसा, प्रकृति बरी, डोळे भेदक, केंस जरा विसकटलेलेच, अंगांत हाफशर्ट, फुलपँट, पायांत चपला, एका हातात ब्रीफकेस व दुसऱ्या हातांत लहानशा दोन पिशव्या, अशा अवतारात, चैतन्य ओसडत असल्यासारखा प्रवेश करून, मोठ्यानें ) शशी ! हं, हीं घे तुझी अंडीं अन् ही भाजी ! आटपला की नाहीं तुझा बाजार !

**शशी** :– ( त्याच्या तोंडावर हात ठेवून ) अरे भाऊसाहेब आले आहेत ! ( त्याच्या हातांतील पिशव्या घेऊन छोट्या खोलीत जाते )

**शान्तू** :– ( घाईत तख्तपोसाकडे वळून ) खरंच की काय ! अरे वा ! ( ब्रीफकेस तख्तपोसावर आपटून खुर्चीवर बसतो. बसतां बसतां ) नमस्कार भाऊसाहेब ! आज इकडे कोणीकडे ! किती वेळ झाला येऊन तुम्हांला ?

**भाऊ०** :— कांहीं, विशेष नाही ! झालीं असतील पंधराएक मिनिटं !

**शान्तू** :– ( आंत असलेल्या शशीला मोठ्यानें ) अग शशी ! भाऊसाहेबांना कांहीं चहाबिही ?

**भाऊ०**:– नको नको ! ( खिशांतील घड्याळ काढून पहातात )

**शशी** :– ( आंतून मोठ्यानें ) अरे सरबत आणतें लिंबाचं – ते चहा घेत नसतात !

**शान्तू** :– ( पुन्हा मोठ्यानें ) पण मला हवा हं ! – अन् थोडा तुझ्याहि-साठीं बरं का ! ( हंसतो ) हं, कसं काय ? – अगदीं सहज आलांत कीं – अगदीच सहज आला नसालच म्हणा !

**भाऊ०** :– (चौकस नजरेनें त्याच्याकडे पहात किंचित् स्मितपूर्वक) म्हटलं तुमची ओळख करून घ्यावी – शशीचा संसार कसा काय चालला आहे तेंहि पहावं म्हटलं !

**शान्तू** :– मग काय काय थापा मारल्या तिनं ? – आणखी भांडली कीं नाहीं तुमच्याशी ?

**भाऊ०** :— ( कौतुकानें ) वा ! तिनं तर एक छोटंसं व्याख्यानच दिलं मला विवाहसंस्थेवर !

**शान्तू** :– ( मोठ्यानें हंसून ) असं का ! ( मोठ्यानें ) का ग ? काय काय बढाया मारल्यास ग तू ? ( भाऊसाहेबाना )– नवा उत्साह आहे !

**भाऊ०** :– ( थोडा धीर येऊन ) पण तुम्ही कायदेशीर विवाह लौकर करून टाकावा हें बरं ! – कारण –

**शान्तू** :– ( तत्क्षणीच पवित्रा बदलवून आव्हान देत असल्यासारखा ) कशाला तो ! म्हणजे एखाद्या उडाणटप्पू रजिस्ट्रारनं मला म्हणायचं, तू नवरा– अन् तिला म्हणायचं, तू बायको – एवढ्याचसाठी ! कसले हे विवाहाचे कायदे – अन् कायदे करणारी मंडळी ! आपला तर मुळींच विश्वास नाहीं तुमच्या या कसल्याच गोष्टीवर ! – साऱ्या थापा इथून तिथपर्यंत !

**भाऊ०** :– तरी पण – तुमचा विश्वास नसला तरी कोरकेंना – तिच्या वडलांना बरं वाटेल तेवढंच ! ( शान्तू हंसें आवरतो ) जुन्या पिढीला लोकापवाद सहन करणं जरा कठिणच जातं – तरुण पिढीपेक्षां ! – खरं म्हणजे ताबडतोब लग्न तरी कर, नाहीं तर तोंपर्यंत घरीं तरी परत जा, असं तिला सांगायलाच पाठवलं आहे मला त्यांनीं.

**शान्तू** :– अरे वा ! मग त्यांनाच काय झालं होतं, स्वतः इथं यायला ?

**भाऊ०** :– ( जरा मोकळ्या मनानें हंसत ) तुमच्या स्वभावावरून ते घाबरत असावे तुम्हांला असं दिसतं आहे !

**शान्तू** :— घाबरणारच ! - पापं करायचीं हवीं तितकी ! – अन् भाऊसाहेब, तुम्हीसुद्धां फार मोकळ सोडता या लोकाना ! – तुमचा धाक कसा नाही त्याना ? ( एकमारखा मारा सुरू करतो ) ते कोरके ! – ते आमचे साहेब, म्हणजे तुमचे जावईबुवा भालेराव ! – त्याचे मित्र मगनभाई – रतीलाल – आणखी असलेच समाजाच्या मुळावर आलेले पापग्रह ! या सगळयांची मिळून नवग्रह लिमिटेडसारखी सस्था स्थापन झाली आहे आता ! – पण सगळयांत वाईट वाटतं मला तुमच्या प्रेमाताईचं ! इतकी सालस मुलगी ! – माझी थोडीशी ओळख झाली होती तिच्याशी ! – पण या सात आठ वर्षांत अगदीच बदलली दिसते ती ! —त्या पापग्रहाची ट्रेझरर झाली आहे आतां ती ! ( शशी सरबत घेऊन येते. भाऊसाहेब शान्तूकडे विमनस्कपणे पहात ग्लास घेऊन सरबताचा एक घोंट घेतात )

**भाऊ०** :– काय भानगड आहे ही ?

**शान्तू** :– ए शशे ! थोड पाणी तर दे तुझा चहा येईपर्यंत ! – नाहीं तर थांब, मीच आणतों – ( उठूं लागतो )

**शशी** :– ( त्याला खुर्चीवर दाबून बसवीत ) अरे पण आणते ना मी ! – कोण तडफड प्रत्येक गोष्टीत !

**शान्तू** :— ( स्वर उतरवून ) प्रेमाताईंची प्रॅक्टिस कशी काय चालली आहे ?

**भाऊ०** :- ( संथपणें ) प्रॅक्टिसपेक्षां गरीबगुरीबानाच औषधोपचार करत असते ती मदत म्हणून ! —पुष्कळशा स्नेहीमंडळीनासुद्धा फुकट मदत करावी लागते तिला –

**शान्तू** :- भाऊसाहेब ! तुम्हांला वाईट वाटणार नसेल तर एक गोष्ट विचारतो – विचारूं का ?

**भाऊ०** :–( गंभीरपणें ) माझ्या मनाची शांति कोणत्याच प्रसगी ढळत नाही हें एकच भांडवल आहे माझं या जगांत !

**शान्तू** :- ( शशी पाणी आणते, त्याचा एक घोंट घेऊन ) पण त्याचाच तर आम्हांला राग येतो ! – साऱ्या देशभर भांडवलदारांचा नंगा नाच चालू असतांना तुम्ही मात्र आपल्या शांतीचं भांडवल घट्ट धरून बसतां ! –

प्रामाणिक माणसाला तिचा कांही उपयोग होत नाही; पण प्रतिष्ठित गुडांचं मात्र चागलं फावत ! ( शशी परत छोटया खोलीत जाते )

**भाऊ ०**:–पण माझ्या सदाचाराचाच फायदा घेतात ना ते ?– दुराचाराचा तर नाही ना ?

**शान्तू** :– म्हणजे काय ? ज्यामुळें गुडांचं फावत तो सदाचार वाटत ! अहो, दुष्टाचा नाश करायला देवसुद्धा अखेर अवतार घेतो म्हणतात ! — देवाला मदत करायला नको तुम्ही ?

**भाऊ ०**:— पण मी निष्क्रिय असतो अस समजू नका !– अहिंसेचं तत्त्व न सोडता जे शक्य असेल ते करीतच असतों मी !

**शान्तू** — ( विचार करीत ) मग तुम्ही अस करा— आजच्या आज घरी गेल्याबरोबर प्रेमाताईला विचारा की तिच्या नांवावर बँकेत किती पैसे आहेत ते !– आणखी हेहि विचारा कीं तो पैसा कुठून आला. मी छडा लावला आहे बर सगळया गोष्टीचा ! तिच्या लग्नाच्या दिवशींचा सारा इतिहास शशीनी सागितला आहे मला !– ती त्या दिवशी रतीलालनी दिलेली नोटाचीं पुडकी !– तो सोन्याचा कबरपट्टा !– तें लक्ष्मीनारायण अन् तें कन्यादान !– चारच महिने झाले ना त्या गोष्टीला !– पण त्या लुचपतीच्या पायावर काळया बाजाराची केवढी इमारत [ उभी झाली आहे याची कल्पना नाही तुम्हाला ] !

**भाऊ ०**:– लुचपत ? ( कठोर दृष्टीने शान्तूकडे पहातात )

**शान्तू** :– लुचपत नाही तर काय ?– भालेराव अन् प्रेमा तेवढे लक्ष्मी-नारायण काय !– आपल्या घरच्या नोकराना कधी दिला आहे का असला आहेर त्यानी ? घरच नोकर म्हणजे म्हसोबा – सटवाई होतात, नाहीं ! — अहो, पापाचीं फळ पचवायला अधिकाऱ्यांशी जी भागीदारी करावी लागते ती उघड अन् अगदीं कायदेशीर मार्गांनीं करायचीं हीच ' स्थळं ' असतात ! तुम्हाला फार वाईट वाटल म्हणे त्या दिवशी ! — झालं ! दुखवटयाचा एक ठराव केला कीं संपली तुमची ' क्रिया ' ! पण त्या क्रियेचा परिणाम काय झाला ? त्या भांडवलावर आतां जमीन जुमला आहे, दुकान आहे आमच्या खात्यांतल्या वस्तूंचा काळा बाजार आहे !– थंडीनं अन् मलेरियानी बेजार झालेल्या लोकांना—त्यांना ब्लँकेटं, कपडा, क्विनीन मिळायच्या ऐवजीं

चाललं आहे त्या नवग्रहांच्या घरांत — पैसा ओढताहेत फावड्यांनीं ! प्रेमाताईचं बँक बॅलन्स चाललं आहे फुगत ! — अन् लोकांना वाटतं तिची प्रॅक्टिस चालली आहे जोरांत ! — पुढं मोफत हॉस्पिटल निघणार आहे म्हणे ! कां हो, साधनशुद्धीवर तुम्ही एवढा भर देतां — पण तुम्हांला हें कसं कळत नाहीं, की पिळणुकीमुळें क्षय झालेल्या लोकांसाठीं मोफत हॉस्पिटल काढणारे, सोळा आणे पिळणुकीतलाच एक आणा या धर्मादाय खात्यांत जमा करतात ? रक्ताच्या पायावर उभारलेल्या या इमारतीना सफेदा मारला कीं तुम्ही जातां त्यांचं उद्घाटन करायला ! (थोडा वेळ थांबून उसळल्यासारखा) अहो, ज्या मोटारीत बसून आलांत ना तुम्ही इथं, — खालीं पाहिली मी ती — तीसुद्धां भालेरावनी निव्वळ हातचलाखी करून डॅमेज्ड् म्हणून स्वस्तांत बळकावलेली मोटार आहे !

**भाऊ० :**—(सारा मनस्ताप गिळून) तुमच्याजवळ पुरावा आहे ?

**शान्तू :**—पुरावा आहे — पण तो माझ्या हातीं कसा येणार ?

**भाऊ० :**—मग अँटिकरप्शन डिपार्टमेंटला कां नाहीं कळवत तुम्ही या साऱ्या गोष्टी ?

**शान्तू :**—(त्यांच्या अज्ञानाची थट्टा करीत असल्यासासारखा हात जोडून) बास् ! — भाऊसाहेब ! — अहो त्या डिपार्टमेंटमधें भांडवलदारी समाजांतलीच माणसं आहेत ना ! — कीं तुमच्या सर्वोदय समाजाचा डिप्लोमा घेतलेले बैरागी भरती केले आहेत तिथं ? — प्रामाणिक माणसाची कुठल्याहि खात्यांत धडगत नाहीं आतां ! — या साऱ्या कुलंगड्यांचा मी पत्ता लावतों आहे हें कळल्यापासून माझीच बदली करायची अगदीं कायदेशीर खटपट चालली आहे सध्यां ! — कशी आहे कायद्याची अंमलबजावणी ! — बरं, या भानगडींच्या विरुद्ध सार्वजनिक ओरड तरी करतां येते का ? — तुमच्याच कायद्याचं १४४ कलम बहाल आहेच वरून ! — आतां तुमच्याच या कायद्याविरुद्ध तुमच्याजवळ तरी इलाज आहे का ? — आहे का ?

**भाऊ० :** — ( खिन्नपणें सावकाश) स्वतः अनासक्त राहून, आदर्श आचरण करीत मानवसेवा करणं हा एकच तोडगा मला माहित आहे — आणि या अशा सेवाधर्माचा स्वीकार करायला सारे लोक हळू हळू तयार होतील असाच माझा विश्वास आहे !

शान्तू : —(उपरोधानें) म्हणजे, थोडक्यांत, भालेरावसुद्धां, हळूं हळूं तुमचा किता गिरवतील म्हणा ना! (हंसतो)

भाऊ०ः— (गंभीर होऊन) हो! या क्षणीं तरी हाच विश्वास आहे मला!

शान्तू : – (हंसत) किती हळूं हळूं ?

भाऊ० :— ( न डगमगतां ) हा ज्याच्या त्याच्या प्रकृतीचा प्रश्न आहे –

शान्तू:— मुळीच नाहीं! हा प्रकृतीचा प्रश्न नाहीं; प्रॉफिटचा प्रश्न आहे हा! प्रॉफिटला जोंपर्यंन्त तुमच्या कायद्याच पाठबळ आहे तोंपर्यंत तो भांडवलाचा प्रश्न आहे! भांडवल वाढवणं जोपर्यंन्त राजमान्य आहे तोंपर्यंत मानवसेवक होण्याऐवजी मॉनॉपॉलिस्ट होणं हाच राजमार्ग आहे! तुमच्याच मुलीची, तुमच्या देखत, तुमच्या घरांत जी प्रकृति बिघडली ती स्वभावतःच ती बिघडलेल्या प्रकृतीची होती म्हणून आणखी बिघडली? तुम्ही पहा बरं तिला आतां सुधरवून?

भाऊ० ः– घरीं जातांच मी तिला विचारीन– तिचं मन मी हळूंहळूं वळवीन–तिला सन्मार्गाला लावीन! मी माझ्याच सरळ मार्गानी जाणार!

शान्तू :– अन् भालेराव आपल्या सरळ मार्गानी जाणार! ( हंसतो ) मी थट्टा नाही करत तुमची; पण लहानपणीं मला माझ्या मास्तरांनीं एक कोडं टाकलं होतं तें आठवलं मला आत्तां! एका बाजूनें तुमचा वैयक्तिक सेवाधर्म अन् दुसरीकडून भांडवलदारांचा जगड्व्याळ शोषणधर्म! हे दोन्ही एका वेळीं चालू राहिले तर काय होईल? मानवी समाज हें एक टाकं आहे असं आपण समजूं या क्षणभर. आतां तें कोडं असं— 'एका टाक्याला दोन नळ आहेत; एका नळानें तें टाकं चार तासांत भरतं आणि दुसऱ्या नळानें तें पांचच मिनिटांत रिकामं होतं; दोन्ही नळ एकदम चालू केले तर तें किती वेळांत भरेल?' ( भाऊसाहेबांकडे पाहून विचारतो ) किती वेळांत भरेल? (हंसून ) तुमच्या सेवाधर्मासारखाच जर माझा विश्वास असता तर मीं उत्तर दिलं असतं कीं तें टाकं हळूंहळूं भरेल एक दिवस असा माझा विश्वास आहे! ( जोरानें हंसत ) – पण मास्तरांनीं दोन चोबाडींत दिल्या असत्या बक्षीस म्हणून!

**भाऊ०** :—( स्मित करीत ) पण मी उत्तर दिलं असतं कीं त्या टाक्याला पडलेलं भगदाड बंद करा आधीं, अन् मग प्रश्न विचारा !

**शान्तू** :— ( अधीरपणें ) एक्झॅक्ट्ली ! माझं तेंच म्हणणं आहे ! तुम्ही आणि तुमच्यासारखे विचारवन्त आतां अधिकाधिक हेंच प्रतिपादन करायला लागले आहेत कीं संपत्तीवरचं व्यक्तिस्वामित्व — म्हणजे भांडवल-दारी — नष्ट करून तिच्या जागीं राष्ट्रस्वामित्व स्थापन केलं पाहिजे ! हें मला ठाऊक आहे ! पण हें हस्तांतर करणार कोण ? आपल्या सरकारनी तर हा प्रश्न दहा वर्षं पुढं ढकलला आहे — तोंपर्यंत हें टाकं भरणं कसं शक्य आहे ? ( शशी चहा घेऊन येते ) तुम्ही मुळीच घेत नाहीं चहा ? ( शशी तख्तपोसावर बसते )

**भाऊ०** :— नाहीं ! ( स्तब्ध बसतात )

**शान्तू** :— ( चहा घेत घेत ) दुसरा प्रश्न असा आहे कीं तुमच्या नळाला ज्या तळ्याचं पाणी येतं ना, त्या तळ्याची किल्लीसुद्धां मॉनॉपॉलिस्टांच्याच हातांत असते ! — कुठं ? इंग्लंडांत — अमेरिकेंत ! — अहो सेवाधर्म आचरा-यलासुद्धां साधनं लागतात ! — आत्तांच मी तुम्हांला सरबत दिलं —

**शशी** :— तूं दिलंस ?

**शान्तू** :— बरं तूं दिलंस ! ( हंसतो ) पण सेवाधर्मच झाला ना तो ?

**भाऊ०** :— ( कृतज्ञतापूर्वक ) कां नाहीं !

**शान्तू** :— पण लिंबू परवडलं म्हणूनच घडला ना तो सेवाधर्म आमच्या हातून ! — नाहीं तर ? सर्व साधनांची किल्ली ठेकेदारांच्या हातीं आहे तोंपर्यंत तुमचा सेवाधर्म — राष्ट्रस्वामित्व — नुसता कोरडा कंठशोष होतो तो ! ( पुन्हां हंसून ) म्हणजे बंद झालेला नळ कसा 'खो ! खो !' असे कोरडे आवाज काढतो — पाण्याचा थेंब मात्र एक देत नाहीं तहान लाग-लेल्या लोकांना — तसला प्रकार झाला आहे आता तुमच्या सेवाधर्माचा ! ( भाऊसाहेबांनाहि हंसू आवरत नाहीं )

**शशी** :— ( न्हाणीघराकडे बोट दाखवून ) सध्यां तेंच चाललं आहे न्हाणीघरांत —!

**शान्तू** :— ( तिला वेडावीत ) हं ! — अन् त्यामुळं मी आतां दिवसभर अशुद्ध रहाणार ! आंघोळबिघोळ कुछ नहीं !

**शशी** :– ( उलटून बोलते ) कशी होणार ! एका बादलींत कसा काय संसार करायचा, भाऊसाहेब ! कधींपासून सांगते आहे मी याला, दोन बादल्या घेऊन ये म्हणून. पण असा कंटाळा आहे याला बाजाराचा !

**शान्तू** :– कंटाळाबिटाळा कांहीं नाहीं भाऊसाहेब ! —( शशीला ) काय थापा मारतेस ! तूं जशी कधीं बाजारांत गेलीच नसशील आतांपर्यंत ! ( भाऊसाहेबांना ) हिचंच अजून ठरलं नाहीं. बादली पितळेची आणायची, कीं जस्ताची कीं लोखंडाची ? शिवाय ती घरीं आली म्हणजे तिला बादली म्हणायचं, कीं बालटी म्हणायचं, कीं अखेर 'बाटली' म्हणायचं हेंहि ठरायचं आहे आमचं !

( इतक्यांत बाहेरून 'सबनीस ! ए सबनीस !' अशी हांक ऐकूं येते )

**शशी** :– ( मोठ्यानें ) अरे ये ना आंत ! उघडंच तर आहे दार! — वात्रट कुठला !

( दार उघडून राम प्रवेश करतो. २०।२२ वर्षे वयाचा पोरसवदा दिसणारा हा कारकून आहे. प्रवेश करतांच भाऊसाहेबांचा आवाज ऐकून दाराशीं थबकतो )

**भाऊ०** :– ( खिशांतील घड्याळाकडे पाहून ) बरं आहे. जातों मी. ( उठून उभे होतात, पण ग्लानि आल्यासारखे पुन्हा बसतात )

**शान्तू** :—( हा प्रकार पाहून हात पुढें करीत) हें काय हें भाऊसाहेब! ( भाऊसाहेब त्याच्या खांद्यावर हात ठेवतात ) तुम्हांला त्रास होतो आहे का ?

**भाऊ०** :— ( त्याच्या आधारानें उभे होऊन) छे छे !

**शशी** :—त्रास होईल नाहीं तर काय ! आल्यापासून तुझ्या तोंडाचा पट्टा एकसारखा सुरू आहे !

**भाऊ०** :- ( शान्तूच्या आधारानें दरवाजाकडे जात) त्रास नाहीं झाला बरं !– उलट तुमच्या तरुण मनाच्या ताजेपणाचं कौतुकच वाटलं मला ! ( ते दाराशीं येतांच राम त्यांना नमस्कार करतो )

( भाऊसाहेब आणि शान्तू बाहेर जातात )

**राम** : – (कपबशा आवरूं लागलेल्या शशीला मदत करण्यासाठीं पुढें होत )– वहिनी ! ( स्मित करतो )

**शशी** : —( त्याच्याकडे पाहून ) का रे राम ! आज बराच खुषींतसा दिसतो आहेस !

**राम** :– खुषींत आहे तर ! आज संध्याकाळीं कांहींतरी विशेष बेत आहे ना ! शान्तूनी आमंत्रण दिलं आहे हूं ! आगांतुकी करायला नाहीं आलों मी ! – आपलं, किती वाजतां येऊं एवढं विचारून ठेवावं म्हटलं होममिनिस्टरला ! – एखादी तरी हड्डी मिळाली पाहिजे चघळायला !

**शशी** : – ( न्हाणीघरांत वळतां वळतां ) हड्डीच चघळायची आहे ना ! – मग शक्य तितका उशीराच ये ! ( न्हाणीघरांत जाते )

**राम** : – ( खोटया आर्जवानें ) अशा निर्दय होऊं नका बुवा ! ( ती बाहेर येतांच गंभीर होऊन ) बरं पण वहिनी, ते महात्माजी कशाला आले होते ?

**शशी** : – ( खोटी दमदाटी करीत ) आपल्या ऑफिसचा संप कधीं बंद होणार आहे तें विचारायला आले होते ! – तुझ्यावर तर ते फारच रागावले होते ! – तूं भालेरावच्या फाइलींतला मजकूर उतरवून घेतोस त्यांच्याविरुद्ध पुरावे गोळा करायला, हें पाप आहे म्हणाले ते ! आपापल्या पापाचं प्रायश्चित्त प्रत्येकानं भोगलं पाहिजे, म्हणाले ते ! ( झटक्यांत छोटया खोलींत जाते )

**राम** : – ( तिच्या मागें दरवाजापर्यंत जाऊन ) खरं सांगा ना वहिनी ! ( तिचें उत्तर येत नाहीं हें पाहून, कठडयापाशीं जाऊन खालीं पहात थोडा वेळ उभा होतो. शशी एका टोपलींत अंडीं आणि कांचेच्या वाडग्यांत चमचा घेऊन बाहेर येते व तख्तपोसावर बसते. राम पुन्हा तिच्या मागें लागतो )– खरं सांगा ना वहिनी ! शान्तू आपला बोलतच उभा आहे त्यांच्याशीं, केव्हांचा ! तुमची त्यांची ओळख आहे कांहीं झालं तरी ! – मला तेवढा दंड होणार काय ?

**शशी** :– ( हंसें दाबून ) काय हवेलंडी झाली आहे ना पण ! हासुखी ! असानी कुठं लढा चालतो ! नाहींतर ते चपराशी पहा ! ही नोकरी गेली तर दुसरी करूं ! नाहीं मिळाली तर माती खोदूं ! दगड फोडूं ! (एका अंडयावर चमच्याचा ठोका देते) पण हार जाणार नाहीं म्हणतात !

**राम** :– पण मी जर कधीं जन्मांत माती खोदली नाहीं—

**शशी** :- मग तांदूळ निवड माझे !— जा घेऊन ये, ताटांत काढून ठेवले आहेत ते आंत— जा !

**राम** :- ( खोलीत जातां जातां ) तें सुद्धां नीट येणार नाहीं मला !

(आंत जातो)

**शशी** :- ( मोठ्यानें ) हं — नुसतं गिळायला येतं तेवढं — मटून पाहिजे नाहीं का खायला ! ( तो तांदुळाचें ताट घेऊन येतो त्याला तख्त-पोसावर बसवीत ) बस असा इथं ! ( तो बसणार इतक्यांत शान्तूच्या पावलांचा धाड्धाड् आवाज होतो. तिकडे पाहूं लागतो. त्याची मान ताटा-कडे वळवीत ) इकडे पहायचं, अन् खालीं मान घालून सूनबाईसारखं गुपचिप काम करायचं ! ( शान्तू येतो. त्याला ) बराच वेळसा लागला ?

**शान्तू** :- ( रामकडे पाहून ) हें ग काय हें ? ( त्याच्यापुढील ताट बाजूला सारीत )- अगदीं निर्दय आहेस तूं !

**शशी** :- ( त्याला आडवीत ) करूं दे, करूं दे थोडं काम !- बरं पण भाऊसाहेब काय म्हणत होते इतका वेळ ?

**शान्तू** :- ( हंसून ) यः पलायते स जीवति !

**शशी** :- म्हणजे काय ?

**शान्तू** :- डोंबल !- सारा पलायनवाद ! थोडक्यांत म्हणजे ते म्हणाले कीं ते स्वतः खरे गांधीवादीच नाहींत मुळीं !—कारण काय, तर गांधीवाद या नांवाची वस्तूच मुळीं अस्तित्वांत नाहीं असं खुद्द गांधीजींनींच अगदीं कळकळून, वारंवार निक्षून सांगितलं होतं म्हणे !

**शशी** :- मग, गांधीवादी नाहींत तर कोण आहेत ते ?

**शान्तू** :— गांधीवादाचे प्रोफेसर आहेत ते !— फिलॉसॉफीचा प्रोफेसर जसा स्वतः फिलॉसॉफर असावा लागत नाहीं, तसं आहे हें ! तात्पर्य काय— गांधीवाद मेला ! गांधींचं नांव चिरायु होवो !

**शशी** :-पण तूं इतकं उद्धटासारखं बोलायचं नसतंस त्यांच्याशीं !

**शान्तू** :-अस्सं ! अन् मी यायच्या अगोदर आपल्या लग्नाबद्दल तूं काय व्याख्यानं झोडत होतीस ?

**शशी** :- तूं माझ्याशीं लग्न करायला घाबरतोस म्हणून सांगितलं मी !

**शान्तू** :- अरे चल ! तुझ्यासारख्या—[ वहा पोरी एकदम तुटून पडल्या

तरी घाबरणार नाहीं मी ] !— ( खालीं मोटारीच्या पोंग्याचा वरचेवर आवाज ऐकूं येत असतो, म्हणून कठड्याकडे वळून खालीं पहातो. क्षण-भरानें मागें परतून ) अरे, हा लफंगा बनिया इकडे कसा काय वळला आज! कांहींतरी काळंबेरं दिसतं आहे हं या तुपाच्या पिपांत ! – ए, तुम्ही दोघे आंत जा बरं एकदम ! – जा जा लौकर ! ( दोघें आंत जातात ) अन् तुझ्या अंड्यांचा आवाज करूं नकोस मुळींच ! – गुपचुप बसा जरा ! ( दरवाजा-कडे वळतो. खोलीकडे पुन्हा पाहून दार उघडतो )

( रतीलाल प्रवेश करतो )

शान्तू :– या या शेठजी ! अरे वा ! आज फार मोठीं माणसं पायधूळ झाडताहेत गरिबांच्या झोंपडींत

रती० :– (काळजींत असल्यासारखा गंभीरपणें) साहेब ! मस्करी करूं नका ! – पण भालेरावसाहेब आतां येऊन गेले ना इथं ?

शान्तू :– ( डोकें खाजवीत ) भालेराव ! – पण तुम्हांला असा संशय येण्याचं कारण ?

रती० :– अहो आत्तां त्यांची मोटार पुढं गेली ती मागून पाहिली ना मी! तुम्हींसुद्धां तर आत्तांच त्यांना पोंचवून वर आले तें सुद्धां पाहिलं मी !

शान्तू :–( हंसत ) हें सगळं पाहिलंत वाटतं ! हो, आले होते !

रती० :– पहा ! म्हणजे केवढी झाली ही ! – ( हलकेच ) घरीं आहे का कुणी ?

शान्तू :– ( त्याला तख्तपोसावर बसवीत ) बसा बसा ! कोणीं नाहीं ! शशी बाजारात गेली आहे पण येईलच ती लौकर ! विशेष कांहीं ?

रती० :–( सुस्कारा सोडून) का हो साहेब ! एका बाजूला पब्लिकमधें तुमच्या पाठीमागें तुम्हांला शिव्या द्यायच्या–आणखी दुसऱ्या बाजूला तुम-च्याशीं, अशी दोस्ती ! – हें असं अलग सलग संगनमत! – अरे, म्हणूनच आजकाल माल येत नाहीं दुकानांत पहिल्यासारखा! – तरी मी विचार करत होतों ! [ हें असं कां होतं आहे ]

शान्तू :–( मोघम भाषा बोलत ) म्हणजे तुम्हांला हें ठाऊक नाहीं ?

रती० :– अरे रामाचं नांव ! — तुमच्या घरची पायरी भालेराव-साहेबांनीं चढणं !

शान्तू :– पण मी समजत होतों कीं तुम्हांला सगळं ठाऊक आहे !

रती० :– ( कातावून) काय ठाऊक आहे !—अच्छा ! याचा बदला घेऊंच कधीं तरी !— बिझिनेसमधें ही बेइमानी ! तरी मला संशय येत होता– [ कांहींतरी गडबड आहे म्हणून ] !

शान्तू :–पण मला तर कधींच आला नाहीं !

रती० :–तुम्हांला कसा येईल हो— [ हें असं अलगसलग– ]

शान्तू :– (गाडी मुद्यावर वळविण्यासाठीं)–बरं, पण मी काय करूं आतां?

रती० : – तुमच्या ऑफिसचा संप बंद करा, अगोदर! – सगळ्या ऑफिसला आणखी गोडाऊनला कुलूप लागलं आहे कधींपासून— अन् पोलिसवाले उभे आहेत फाटकावर !—सगळी गडबड होऊन गेली आहे त्यामुळं !— माल येणं बंद होऊन गेलं आहे कधींचं !

शान्तू :– पण भालेराव तर माल नेताहेत ! हीच तर वेळ आहे माल न्यायची ! तुम्हांला कळवलं नाहीं त्यांनी ?— आश्चर्य आहे !

रती० :– आणखी तुम्ही नेऊ देता ?

शान्तू :– मग ? इतके दिवस संप कशाला चालू ठेवला आहे ?संपाचे पुढारी उगीच झालों वाटतं !—मी काय, हुकमाचा ताबेदार !—संप चालू ठेवा म्हटलं, चालू ठेवला ! बंद करा म्हणत असाल तर बंद करतों !

रती० :– (त्रागा करीत) अरे पण मला काय फायदा हो या संपाचा ? भालेराव तिकडल्या तिकडे माल नेतात—आणखी वरून तुम्हांला शिव्या देतात पब्लिकमधे !—सबनीससाहेब ! आपण तर थक्क झालों ! तुम्ही मराठे आतां मारवाड्यावर ताण करायला लागले अं !

शान्तू :– हें पहा शेठजी, मला दोष नका देऊं उगीचच ! मला वाटलं तुम्हांला सगळं ठाऊक आहे ! मी भालेरावला शिव्या देतों शिस्त म्हणून ! ते मला शिव्या देतात शिस्त म्हणूनच ! त्यांची माझी दुष्मनी थोडीच आहे ! ठरल्याप्रमाणें सगळं ठीक चाललं आहे, अन् मला वाटलं तुम्हांला कळवूनच चाललं आहे हें— अन् तुम्हांला मालहि मिळतो आहे असं समजत होतों मी !

रती० :– ( सात्विक संताप जागृत झाल्यासारखा ) बोडख्याचा माल मिळतो आहे मला !—बुडवून राहिले आहेत मला ते !

शान्तू :- मग मात्र कमाल आहे हं ! मला ही भानगड ठाऊक असती तर मी त्यांना स्वच्छ सांगितलं असतं—( रतीलाल विचार करीत असल्यासारखा दिसतो ) का, विचार कसला करतां ?

रती० :- तुम्ही एक काम करतां ?—( आतां शान्तू विचार करतांना दिसतो, त्याची मांडी हालवीत ) अरे, ऐका तर ! ( खिशांतील पैशाचें पाकीट काढूं लागतो )

शान्तू :- पण मोठा धोका आहे हो यांत !—कारण स्टोअरची किल्ली आहे माझ्याजवळ, अन् कोणता माल किती आहे हें सगळं ठाऊक आहे भालेरावला ! ( रतीलाल दहा दहाच्या वीस नोटा मोजतो व पाकीट खिशांत परत ठेवतो )—भालेरावला नक्कीच सशय येईल माझा !

रती० :- ( नोटा त्याच्या हातावर जबरदस्तीनें ठेवीत ) हें ठेवा, अन् काय करायचं कसं करायचं तें तुमचं तुम्ही पाहून घ्या !—अरे मोठे घुटेल लोक आहांत हो तुम्ही !

शान्तू :- ( सात्विक संतापाचें सोंग करीत नोटा परत देतांना ) हें पहा, माझा कांहीं दोष नाहीं यांत ! उलट सगळ्या गांवांत माझी बदनामी भालेराव करताहेत तो शिस्त म्हणून मुकाट्यानं आतांपर्यंत सहन करत आलों मी !—[ तुम्हांला ते फसवीत आहेत— ]

रती० :- ( नोटा त्याच्या हातांत दाबीत ) अरे पण जाऊं द्या ना आतां मागच्या गोष्टी ! भालेरावची समजली आतां !

शान्तू :- हं, असं म्हणा !

रती० :- मग आता क्विनाइनच्या किती पेट्या पाठवतां ?

शान्तू: ( नोटा मोजत ) किती आहेत हे ?

रती० :- दोनशें !

शान्तू : बस् ?—मग एक पेटी पाठवतों !

रती० :- अरे वा साहेब !

शान्तू :- तर मग ? अहो मी लग्न केलं आहे नवीन !—बायकोची पीडा मागें लागली आहे—बिल्वर हवे म्हणे !—आठ तोळ्याचे ! याच्यांत फार तर एक बिल्वर होईल !—एकच बिल्वर घालूं तिच्या हांतांत ?

रती० :- ( पाकीट काढून उरलेल्या नोटा देत ) आणखी दोनशें आहेत.

**शान्तू** : ( नोटा घेऊन ) हो, म्हणजे निदान दोन तरी होतील !

**रती०** :– पण कमींत कमी चार पेट्या तर पाठवा ! (जिन्यांत पावलें वाजतात )

**शान्तू** :– आली वाटतं शशी ! पहातों हं— ( दाराकडे वळतो )

**रती०** :– ( त्याचा हात धरून थांबविण्याचा प्रयत्न करीत ) मग जरूर पाठवतां ना चार पेट्या ? केव्हां पाठवतां ?—

**शान्तू** :– आजच्या आज पाठवतों—अन् संप चालू ठेवतों ! काय ? ( घाईघाईनें दार उघडतो. रायभान चपरासी दिसतो त्याला ) काय रे ?

( रायभान प्रवेश करतो )

**रायभान** :– ( घाबरल्यासारखा ) अजी साहेब, ऐका त !—

**शान्तू** :– ( दरडावून ) चूप रहा बरं ! आणखी शेठजीना नमस्कार कर अगोदर ! ए राम ! ए शशी ! अरे बाहेर तर या ! शेठजींनी वर्गणी दिली ना आपल्या यूनियनला !

( राम व शशी बाहेर येतात व हंसूं लागतात. रायभान स्तंभित होतो. रतीलाल तर गागरतोच. )

**रती०** :– ( शांतूच्या हातून नोटा परत हिसकण्याचा प्रयत्न करीत ) अरे वा साहेब ! वा वा वा !—हें असं असत्य !

**शान्तू** :– (जोरानें हंसत) असत्य ! हाः हाः हाः ! ( त्याची मान धरून त्याला बाहेर ढकलूं लागतो ) निघा बाहेर आतां !

**रती०** :– ( विरोध करीत ) अरे, म्हणजे वरतून आणखी हिंसा करतां? हिंसा !

**शान्तू** : –( त्याची हंसून मुरकुंडी वळणार, पण त्याआधीं ) हिंसा ! हाः हाः हाः ! हिंसा ! आतां बाहेर जातो कीं ! गेट आऊट ! नाहींतर पूज्य बापूंच नांव घ्यायची वेळ येईल ! गेट आऊट ! ( रतीलाल घाबरल्यासारखा एकदम पळ काढतो ) — स्काउन्ड्रल लेकाचा ! क्विनीनचा काळा बाजार करायला हवा लेकाला !

**राय०** :– हः हः हः !—अरे बापा, हे का आहे जी ?

**राम** :– ( घाबरला असूनहि हंसत ) कमाल आहे रे बाबा तुझी !

**शशी** :– (हंसत) तुझ्याजवळ स्टोअरच्या किल्ल्या कधीं आल्या रे ?

**शान्तू** :– तूं बिल्वर मागितलेस त्या दिवशीं ! हाः हाः हाः !!

**राय०** :–( एकाएकीं आठवण होऊन ) अजी सबनीससाहेब, हासून का राहिले—ऐका त सही ! ( सगळे गंभीर होतात )

**शान्तू** :– काय रे, काय झालं ?

**राय०** :– अजी केवढा गजहब झाला होता— अरे बापरे !

**शान्तू** :– (थट्टेखोरपणें ) शशी ! याला एक ग्लास पाणी दे पाहूं ! ( त्याला तख्तपोसावर खांदे धरून बसवीत ) खालीं बसा आधी !

( शशी खोलींत जाते )

**राम** :–( घाबरून ) काय झालं तरी काय, रायभान ?

**शान्तू** :– (त्याला खुर्चीवर बसवीत ) शशी ! (मोठ्यानें) दो गिलास पानी ! (रामला) बसा ! — कोणी मेलं नाहीं !

**राय०** :– अजी मेले नाहीं, पन मरतां मरतां बाचले ना तुम्ही ! ऐका त ! (शशी दोन ग्लास पाणी आणून दोघांना देते, रायभान तें एका झटक्यांत पिऊन टाकतो) अजी तुम्ही दिल्लीस बदली होते म्हून भेत!—पन तुमची त देवाच्या घरीं बदली करायची तय्यारी होऊन राहिली !

**शान्तू** :– ( त्याच्यासमोर ताठ उभा होऊन ) अस्सं ? कशी काय तयारी चालली आहे ?— कोण करतो आहे ?

**राय०** :– अजी तो मगनभाईचा डरायवर संकर आहे कीं नाहीं जी! – तो माह्या मोहल्ल्यांत राह्यते तो— तो काल रातचा दारूच्या नशेंत मज कां म्हने—तुमचा संप कधीं बंद होनार आहे म्हने ! मीनं म्हनलं होईल एक-दोन दिवसांत ! बाबू लोक पस्त हिंमत झाले ! — उद्यांपासून जाऊ ना जी आपुन कामावर ?

**शान्तू** :– हो— पण पुढें तर सांग !

**राय०** :– त तो म्हने तुमच्या दप्तरांतल्या एका बामनाची गठडी बांधायची आहे म्हून— दोन गुंडे बलवायले सांगितले म्हने बेंजामिन साहेबाच्या डरायवरनं !

**शान्तू** :– (आश्चर्यानें) तुझ्या साहेबाच्या ड्रायव्हरनी ?

**राय०** :– हो ना जी ! माह्या साहेब अन् त्याचा डरायवर– दोघे भी पेतेत नाहीं का जी संकरच्या हातची हातभट्टीची दारू – त्याहिची मोठी दोस्ती

आहे! — त मीनं संकरले असंच पुसलं, कोनता काम असन बा ! मी भी पेलो मग थोडी त्याच्यासवं ! —तव्हां खुलला महासाळा ! तो म्हने भालेराव साहेबाची सबनीससाहेबाशी काहुन एवढी दुष्मनी आहे बा ! मग का म्हने लमचा ! —सबनीससाहेब दिसते त तगडा, पन कांहीं दम आहे की फोपश्याच आहे ? मग मीन का केलं ! —रागावूं नका साहेब— बहाना केला मी नुसता!

**शान्तू** :— अरे, रागवायला काय झालं ! — काय म्हणालास काय तूं? आठवतं आहे ना पण नीट आतां ! (हंसतो )

**राय०** :— (हंसून) अजी मी का तुल्ल झालों होतों म्हनता का जी ! (पुन्हा हंसून)— त मीनं म्हनलं, ' तो! — अरे एक रहेपट देल्ली त तीन कोलाटचा खाते ! —तो काहूचा ! ' — त तो म्हने, ' अरे रहेपटीचं काम नाहीं येथंसा— त्याची खोपडी खोलायची आहे ! '

**शान्तू** :— (गंभीर होऊन) असं ?— कधीं अन् कुठं ?

**राम** :— ( खरोखरच घाबरतो ) अरे ए बाबा ! आतां तूं त्यांच्या अंगावर जाऊन पडणार आहेस वाटतं !

**शान्तू** :—( त्याला बाजूला सारून) तू चुप रहा रे !

**राय०** :— आतां उद्यां दप्तरांतून वापस याल कीं नाहीं जी सायकलीवरून तुम्ही ! — त्या बंडीपेठेच्या चौरस्त्यावरून गल्लीत घुसले कीं बस्–तेथसाच !

**शान्तू** :— अस्सं ! ठीक आहे— (सिगरेट पेटवून व पँटच्या खिशांत हात घालून फेऱ्या घालूं लागतो) शशी ! — सैपाक कर बरं लोकर ! —अन् तुम्ही दोघेहि इथंच जेवा रे !

(शशी खोलींत जाते)

**राम** :— ( शांतू आपल्या मनाशीं विचार करीत असतांना रायभानला ) काय दुष्ट आहेत रे हे लोक !

**राय०** :— हरामजादे महासाळे !

**राम** :— पगारवाढ राहिली बाजूला— वरतून हें बक्षीस !

**राय०** :— पगारवाढ काहूची देतेत भडवीचे !

**राम** :— अरे तुझ्या बेंजामिनसाहेबानी शिफारस तरी केली आहे ! — पण आमचे भालेरावसाहेब ! — त्यांनीं सरकारला बचत कशी करायची तें शिकवलं आहे ! — कारकुनांना पुरेसं काम नसतं म्हणे! — आपण बसतो म्हा-

सहा सातसात वाजेपर्यंत– अन् मलाहि बसवून ठेवतो हरामखोर !– पुरेसं काम नाहीं म्हणे !

**राय०** :– अजी माहा साहेब त घरीं भी बलावते जी सकारचा अन् पुन्हा रातचा भी !– झाडझूड कराले, बिस्तरे घालाले, बगीच्याले पानी द्याले ! मिसीबाबा – बाबालोकाहिस खेलवाले ! हे का चपराशाचे काम झाले का जी ! पगार भेटतेत थैल्या भरभरूं– अधिक नोकर भेटतेत मुफतचे काम करायले !

**राम** :– हो ना ! आपलीं घरचीं कामं राहिलीं बाजूला – यांचींच कामं करा दिवसरात्र ! माझ्या घरीं काय माझ्या बापानी नोकर ठेवले आहेत !– घरचा बाजार करायला मीच !– औषधपाणी आणायला मीच !– रेशनच्या दुकानांत तासन्तास उभा रहायला मीच !–माझे कपडे धुणं –लहान भावाला शिकवणं – हें सगळं राहिलं बाजूला ! कचेरींत काम आटोपलं नाहीं त्याचं म्हणजे बंगल्यावर बोलावतो लेंकाचा ! सकाळ नाहीं, सुट्टी नाहीं –

**राय०** :–( मधेंच ) पन मले राग आला त मी का करतो सांगू ? साहेबाच्या पोट्ट्यास घेतो एक चिमटा !– कीं लागते लम्चं टेंभलाले! –मग साहेबाची रांड !– नांव भी का साजरं आहे तिचं !– मेरी !– मी त मेरी मेमसाहेबच म्हनतो जी तिले !– पोट्टं टेंभलाले लागलं की मेरी मेमसाहेब मज का म्हनते, ( वेडावून दाखवतो ) ‘ रायबान ! चोटा बाबा लोगको पारकमें ले जाव जल्दी ! ’ – बस् ! त्या पोट्ट्यास नेऊन पटकतो पारकांत, अन् मी भी करतो आराम ! ते पोट्ट लम्चं बोंबलतेच बोंबलते ! अधिक बोंबललं की दे बत्ती !– बोंबललं कीं दे बत्ती !! ( हंसतो )

**राम** :—(खंत वाटून) काय दुष्ट आहेस रे ! शीः !

**राय०** :– काहुन राग नाहीं येनार जी ! अजी माह्या पोट्ट्यास आठ आठ दिवस घ्यायले नाहीं होत !–मेले आहेत की जिते ते भी समजे नाहीं !– अन् माही नवरी ! ते भी लम्ची जनतेच् जनते !– का करावं, आपल्यास त कांहीं समजेच नाहीं ! मी त आतां एक दिवस बेंजामिनसाहेबासच देतो बत्ती मुंडाहिच्या हातोरी !

**शाम्बू** :—(त्याच्यापुढें एकदम उभा होऊन) हं, खबरदार रायभान

असा कांहीं गुंडपणा करशील तर! का रे राम? भालेरावचा ड्रायव्हर आपल्या यूनियनचा मेंबर आहे ना रे?

राय० :— (मधेंच तोंड घालून) भालेरावचा की मगनभाईचा जी?

राम :-(त्याला चुप बसवीत) मगनभाईचा ड्रायव्हर मेंबर कसा असेल?

राय० :—तेच त म्हनलं मीनं!

राम :—तेंच काय म्हटलंस बोडखं! (शान्तूला) हो, आहे मेंबर!

शान्तू :—कसा काय आहे तो? भालेरावशीं कसं आहे त्याचं?

राम :—अगदीं कंटाळला आहे तो त्याच्या नोकरीला!

शान्तू :—मग असं कर-जेवण झाल्याबरोबर त्याला बोलावून आण-आणखी हें पहा, मी त्या रिंगेला पत्र देतों-(राम जिज्ञासेनें पहातो) अरे तो पोलिस इन्स्पेक्टर रिंगे! हल्लीं ॲन्टिकरप्शन डिपार्टमेंटमधें काम करतो तो!-तो फार बढाया मारत असतो माझ्याजवळ आपल्या हुशारीच्या अन् प्रामाणिकपणाच्या! त्याला घेऊन जा माझं पत्र! माझा उद्यांचा बेत जवळ जवळ पक्का झाला आहे —

राम :—कसला बेत?

शान्तू :—सांगूं? (आंत असलेल्या शशीला मोठ्यानें) शशी! इकडे ये बरं!-येऊं दे तिला, थांब! (तिची वाट पहात असतां)

[पडदा]

# अंक तिसरा :

(स्थळ पहिल्या अंकांतील. दिवाणखान्यांत पूर्वी असलेलें देवघर नाहीं. त्या जागीं टेबलावर लेखनसाहित्य आहे. फर्निचरची व्यवस्था थोडी निराळी आहे. फोटोंना पूर्वींचे हार नाहींत.

पडदा वर जातो त्या वेळीं प्रेमा दिवाणखान्यांत एकटी बसली असते. तिच्या हातांतील पुस्तकांत तिचें लक्ष नाहीं. कारण एक दोन पानें चाळल्या-सारखीं करून खिन्नपणें ती तें बाजूला टाकते. नंतर शेजारीं पडलेलें वर्तमानपत्र घेऊन त्याचीं पानें उलटसुलट करते, आणि तेंहि बाजूला टाकून उसासा सोडते. नंतर रेडियो चालू करते. रेडियोवर ऑर्केस्ट्रा वाजत असतो. ऑर्केस्ट्राच्या साथीबरोबर ती गाते)

**प्रेमा :—**

*जीवनीं पाऊल मिटल्या लोचनीं मी टाकिलें*
*पाहतां भवितव्य पुढचें गाढ तिमिरें दाटलें*
*देव पाषाणास मानुनि मनिं फुलोरा बांधला*
*दगड पुजला दगड उरला तोच पुरता पावला*
*मूक आशांच्या कळ्या वेलींतुनी डोकावल्या*
*मूर्त नाशाचें बघोनी भूत भीषण करपल्या*
*करपल्या श्रेयार्थ पडल्या आहुती नेत्रांतल्या*
*हरमलें तें परतलें ना, नेत्र मिटती पाकळ्या*

**ऑल इंडिया रेडियो :—**(ऑर्केस्ट्रा व गाणें बंद होतांच) यह ऑल इंडिया रेडियो है. अभी आप छपे हुवे प्रोग्रामके बदले हमारे स्टूडियो कला-

कारोंसे राग काफी की एक तर्ज सुन रहे थे। इस वख्त शामके छह बजा चाहते हैं। थोडी देरमें आप समाचार सुनेंगे।

( प्रेमा उठून रेडियो बंद करते व भाऊसाहेबांच्या खोलींत जायला वळते तोंच शशी प्रवेश करते. तिच्या हातांत वर्तमानपत्राची घडी, पर्स आणि पाले-भाजी असलेली पिशवी आहे. प्रवेश करून ती इकडे तिकडे पहाते तों प्रेमाचें तिच्याकडे लक्ष जातें)

**प्रेमा** :—कोण शशी ! ये ये ! (तत्परतेनें पुढें होऊन तिचा हात धरून कोचावर बसवीत) तू आलीस, किती छान झालं ! (तिच्या बोलण्यांत खिन्न-तेची छाया उमटत असते) खरं सांगू ! – आज दिवसभर एकसारखी आठवण येते आहे तुझी मला ! थोडया वेळानी तुझ्याकडेच यायचा विचार चालला होता माझा !

**शशी** :– हात्तिच्या ! मग जाऊं या कीं आत्तांच ! कशी आहे भाऊ साहेबांची प्रकृति ?–त्यांना भेटतें, मग जाऊं आपण ! काल माझ्या घरून परत गेले तेव्हां फारच थकल्यासारखे दिसत होते ते !–कुठं आहेत, आंत आहेत ना ? (वळते)

**प्रेमा** :—(तिला आपल्याजवळ कोचावर बसवीत) अग पण आल्या-सारखी बस कीं थोडा वेळ ! – भाऊंचा डोळा लागला आहे जरा – (शशी बसते) काल रात्रीं फार त्रास होत होता ग त्यांना ! भारी काळजी वाटते मला त्यांची ! (मोठ्यानें) पैकू ! (शशीला) काय घेतेस ? चहा कीं आणखी कांहीं ? ऑफिसमधून सरळच आलीस ना ? (पैकू येतो)

**शशी** :– कांहींहि चालेल – पण मुद्दाम करूं नका कांहीं – घरीं शान्तू वाट पहात बसेल उगीच, उशीर झाला तर !

**प्रेमा** :–(पैकूला) अरे पंडितला सांग पोहे अन् चहा पाठव म्हणावं ! (पैकू जातो) बाळ कचेरीतून यायची वेळ झाली आहे – पोहे – चहा तयारच असेल ! ( पांच सात सेकंद दोघीहि स्तब्ध असतात. खालीं मान घालून ) शशी !

**शशी** :– (उसासा सोडून प्रेमा स्तब्ध रहाते म्हणून थोडया वेळानें) कशासाठीं येणार होतां तुम्ही ? शब्दशः वाट चुकलांत असं म्हटलं असतं मी !

**प्रेमा** :-(मनांतले कढ मनांतच दाबत) खरं सांगू ?-खरोखरच वाट चुकले मी ! (वर्तमानपत्र उचलते-लगेच तें बाजूला टाकून उसासा सोडते)

**शशी** :- (पुन्हा स्तब्धतेचा भंग करण्यासाठीं) बाबा आले होते का अशांत इकडे ?

**प्रेमा** :- (तिच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष करून कांहीं वेळानें) शशी !

**शशी** :-(प्रेमा पुन्हां स्तब्ध होते. म्हणून पांच-सहा सेकंदांनीं) काय, बोला ना !

**प्रेमा** :- (काय बोलावें हें न सुचून शशीचे एकाएकीं गालगुच्चे घेत अधिकाधिक आवेश चढत गेल्यासारखी) शशी ! तुझा हेवा - मत्सर वाटायला लागला आहे मला कालपासून !

**शशी** :- ( गोंधळल्यासारखी प्रयत्नपूर्वक आपले गाल सोडवून घेऊन ) इश्श् ! हें काय हें वेडयासारखं ! ( स्मित करते )

**प्रेमा** :- ( तोंड झांकून घेते. लगेच शेजारच्या सोफाचेअरवर जाऊन बसते व गहिंवरून ) खरोखरंच वेड लागेल मला आतां ! जगू नये तें जिणं जगावं लागणार आहे ग मला यापुढं ! - तूं किती सुखी आहेस ! (डोळे पुसते )

**शशी** :- ( उठून प्रेमपूर्वक तिच्या सोफाचेअरच्या हातावर बसून शून्यांत पहात ) प्रेमाताई ! मला कळतं बरं सारं ! — पण, पण त्याला उपाय—

**प्रेमा** :- ( हताश झाल्यासारखी ) उपाय ! — कितीतरी आहेत ! मला ठाऊक का नाहींत ? — पण धैर्य ? - तुझ्यासारखं धैर्य असतं तर हें असं वेडयासारखं कशाला झालं असतं ! - तुझ्यांत, शान्तूंत धैर्य आहे - म्हणूनच तुम्ही सुखी आहांत ! ( दुःखाचा उमाळा येऊन ) मी मूर्ख असतें तरी सुखी झालें असतें ग ! पण अक्कल असून धैर्य नसलेलीं माणसं -!

**शशी** :- ( समस्या पूर्ण करते ) त्यांचा बुद्धिनाश होतो ! वेडयासारखं बोलायचालायला खरोखरचंच वेड लागायला नको !

**प्रेमा** :- ( खालीं मान घालून ) बरं आहे तें ! - काल दुपारीं घरीं परत आल्यावर भाऊ तुमची, दोघांच्या धैर्याची इतकी स्तुति करत होते - इतकं कौतुक करत होते -

**शशी** :– ( आश्चर्यचकित होऊन मोठ्यानें ) खरंच ? मला तर वाटलं त्यांनीं आम्हांला अगदीं मूर्खांत काढलं असेल !

**प्रेमा** :– छे ग ! – त्यांनीं तसं केलं असतं तर – तर मग मला तरी हेवा कसा वाटला असता तुझा ! – ते म्हणाले, शान्तू अतिशयच तल्लख माणूस दिसतो ! – मला नाहीं का ठाऊक तें ! आणखी तुझ्या लग्नाबद्दल काय म्हणाले सांगू ?

**शशी** :– ( अनावर जिज्ञासेनें ) काय म्हणाले ?

**प्रेमा** :– ( स्वतःची कींव पण शशीची प्रशंसा करीत )स्वयंवर म्हणाले!

**शशी** :– ( मोठ्यानें ) खरंच ? ( हंसते ) पण खरंच, पूर्वीची आपल्या-कडची स्वयंवराची चाल खरोखरच किती छान होती नाहीं ! ( डोळ्यांत तेज चमकल्यासारखी ) सर्वांसमोर, आपलं श्रेष्ठत्व सिद्ध करणाऱ्या पुरुषाचं, विजयी वीराच पाणिग्रहण करणारी त्या काळची भामिनी ! – तिला मिळ-णारी मानमान्यता – नाहीं तर आजकालचे विवाह ! पैशांनीं फुगलेल्या एखाद्या लठ्ठ थैलीच्या मानेबरोबर आपली मानगुटी आवळून घेणारी आज-कालची ' कामिनी ' ! ( तुच्छतापूर्वक हंसते. प्रेमाकडे पाहून स्वतःच्या विचा-रांना बांध घालते. )

**प्रेमा** :– ( शून्यांत पहात ) भाऊंना कोणाच्याहि धैर्याबद्दल फार आदर वाटतो ! –सत्याग्रहांतल्या श्रेष्ठ धैर्याशीं गांधीजींच्या सहवासांत माझी ओळख झाली नसती तर मी मार्क्सवादीच झालों असतों असं म्हणतात ते ! –तूं वाचला आहेस मार्क्सवाद ?

**शशी** :– छे हो ! – शान्तू सांगत असतो आपला मधून मधून !

**प्रेमा**:– ( जिवाची तगमग चालल्यासारखी ) शशी ! – कालचा तो किळसवाणा दिवस ! शहारे येतात अजून आठवण झाली कीं ! भाऊंनीं केलेली तुमची तोंडभर स्तुति अन् आमच्याबद्दल त्यांनीं उच्चारलेले, आंतल्या आंत तडफडत उच्चारलेले चारच शब्द ! – बाळ नाहीं नाहीं तें बोलला ग काल त्यांना ! – भाऊ बिचारे नुसते ऐकून घेत होते ! – किती शान्त आहेत ते ! ( उसासा )

**शशी** :– ते शान्त राहूं शकतात म्हणूनच त्यांना सत्याग्रहांतलं धैर्य श्रेष्ठ वाटतं ! – पण जे अन्यायाच्या प्रत्यक्ष आघाताखालीं रोजचे रोज चिरडले

जातात, त्यांच्या अंगांतलं उरलंसुरलं रक्त एखादे वेळीं खवळलं म्हणजे कशी टिकणार त्यांची शान्ति ! पाय पडला म्हणजे मुंगळा उलटून चावतो म्हणूनच बरं आहे नाहीं का त्याच्या दृष्टीनं ! — नाहीं तर कोण पर्वा करील त्याची ! ( थांबून ) भाऊसाहेब नाहीं, पण तुम्हीसुद्धां उलटून बोललां नाहींत भालेरावांना ! — मी असतें —

**प्रेमा** :— काय बोलूं! —मला कुठं येतं आहे त्याच्यासारखं अर्थशास्त्र त्याच्याशीं हुज्जत घालायला ! — भाऊंचीच तर किती पंचाइत होते ! भाऊ काळ्या बाजाराची अगदीं किळस आल्यासारखे बोलत होते तर तो म्हणाला, 'काळा बाजार नको आहे तुम्हांला तर बंद करा कीं तुमचे कायदे करून ! पण बंद होणार नाहीं तो तुमच्या कायद्यांनीं ! —कारण ज्या बाजाराला तुम्ही पांढरा समजतां तोसुद्धां आंतून तितकाच काळा आहे !' मला तर कांहींच कळत नाहीं यांतलं ! — एवढं मात्र वाटलं कीं ( गहिंवरून ) मी भाऊंना फसवलं ! — काय करूं कांहींच समजत नाहीं मला ! — अरे देवा रे !

**शशी** :— ( थोडा वेळ विचार करून ) शान्तू नेहमीं म्हणत असतो, कीं इतिहासाच्या चक्रावर बसलेल्या माणसानं, त्या चक्राला आपल्या हातांनीं गति देतांना, स्वतःला भोंवळ येण्यापूर्वीं तें थांबवण्याची व्यवस्था जर अगोदरच करून ठेवली नाहीं, तर एकदां भोंवळ आलीं कीं मग नाहीं थांबवतां येत तें चक्र ज्याचं त्याला ! — मग तें आपोआप थांबेपर्यंत वाट तरी पाहिली पाहिजे, नाहीं तर, नाहीं तर —

**प्रेमा** :— (असहाय झाल्यासारखी तिच्याकडे पहात) नाहीं तर काय ? — मेलं पाहिजे, हेंच ना !

**शशी** :— ( तिचें सांत्वन करीत ) छे हो ! — मरायलाच पाहिजे असं नाहीं ! पण दुसरा कोणी तें चाक थांबवूं लागला तर वेड्यासारखं त्याला अडवूं तरी नये निदान ! — दुसरं कांहीं करतां येत नसेल तर ! ( थोडा वेळ स्तब्ध राहून ) बरं म्हणजे तुम्हांला हाच निरोप सांगायला शान्तूनं मला पाठवलं आहे तुमच्याकडे —

**प्रेमा** :— (या सहानुभूतीवर विश्वास बसत नसल्यासारखी ) —अजून ! —अजून त्याला माझ्याबद्दल आपुलकी वाटते ! (शशी सुर्वीच्या हातांवर असून शून्यांत पहात असते, तिच्या कंबरेभोंवतीं विळखा देऊन ) पण कोण

कसं थांबवणार आहे हें दुश्चक्र आतां मला वाचवायला ? तो झाला तरी आतां यापुढं कसा काय वाचवणार मला ! — एका गांवांत असून गेल्या चार महिन्यांत एकदांसुद्धां तोंड पाहिलं नाहीं त्यानी माझं ! ( हताश झाल्यामुळें निश्वास सोडून )- पण मला तरी काय अधिकार उरला आहे ! – का म्हणून त्यानी मला सहानुभूति दाखवावी ! आई ग !

**शशी** :– तसं नाहीं बरं ! – त्याला फार वाईट वाटतं आहे तुमच्याबद्दल! पण तो म्हणाला, मी तिला वाचवण्याचा प्रयत्न केला, अन् आजच्या घटनांचं चक्र एकदम थांबवलं, तरीसुद्धां कांहीं वेळ तिला भोंवळ येत रहाणारच ! – या गोष्टीला तुमची तयारी आहे कीं नाहीं हें विचारायलाच त्यानी तुमच्याकडे पाठवलं आहे मला ! ( प्रेमा शशीकडे आतुरतेनें पाहूं लागते)

( पैकू चहाचें व पोहे असलेलें ट्रे घेऊन येतो )

**प्रेमा** :– ( पैकूला ) ठेव या इथं. आणखी हें पहा, साहेबांची गाडी दिसली कीं येऊन साग मला, जा – ( पैकू बाहेर जातो )- ये शशी ! ( दोघी आपल्याच तंद्रींत असल्यासारख्या पोहे खाऊं लागतात. थोडया वेळानें उरलेले पोहे बाजूला सारून )– शान्तूला माझी अगदीं किळस आली असेल, नाहीं ?—पण यापुढं खरोखरच माझे हाल होतील त्याबद्दल—[ निदान सहानुभूती तरी असूं दे– ]

( पैकू प्रवेश करतो )

– का रे ? आले वाटतं साहेब ?

**पैकू** : – जी हो – गाडी येऊन राहिली आहे !

**प्रेमा** : – ( शशीहि आपली बशी तत्काळ बाजूला सारते हें पाहून ) कां ग ? टाकूनसे दिलेस ! भूक लागली असेल ना तुला ! ( तिच्यापुढें बशी सरकवते )

**शशी** : – ( बशी बाजूला सारून ) जाऊं या आतां आपण ! (कपांतील चहा एकदम गट्ट करते )

**प्रेमा** : – ( पैकूला ) जा, पंडितला साहेबांचा चहा तयार करायला सांग. ( पैकू जातो )—हें ग काय ? थंड का होता चहा ? ( आपला कप तोंडाला लावून ) चांगला कढत तर आहे !

**शशी** :- ( उठून उभी होत ) तसं नाहीं – मला किनई बहा खूप कढत हवा असतो ! – शान्तू तर त्यामुळं मला नेहमीं फायरईटरच म्हणतो! ( स्मित करते )– चला, चलतां ना ! मला साहेबांच्या दृष्टीला पडायचं नाहीं इथं उगीच ! – चला चला ! थोडं आणखी बोलायचंहि आहे मला तुमच्याशीं – शान्तू म्हणाला –

**प्रेमा** : – ( विचार करीत ) पैकू ! ( पैकू येतो )– हें बघ शॉफरला हळूंच सांग, गाडी गराजमधें टाकूं नकोस म्हणावं – बाईला बाहेर जायचं आहे सांग, जा – ( तो जाऊं लागतो ) आणखी हें बघ, साहेबांच्याबरोबर आणखी कुणी असेल – पण राहूं दे, कांहीं नाहीं, जा लौकर ! ( पैकू जातो) ये शशी !

( दोघी भाऊसाहेबांच्या खोलींत जातात. पांच सात सेकंद दिवाणखान्यांत कोणीच नसतें. नंतर खादीचा सूट व हॅट अंगांत असलेला भालेराव कोरकेबरोबर प्रवेश करतो )

**भाले०**:– बसा कोरके, अत्ता येतों मी ! ( आपल्या खोलींत जातो. कोरके दिवाणखान्यांत इकडे तिकडे पहात बसतो. दहाबारा सेकंदांनीं खांद्यावर कचेरींतील फाईलसचा बस्ता घेऊन पैकू प्रवेश करतो व भालेरावच्या खोलींत जातो. दोन तीन सेकंदांनीं तो रिकाम्या हातानें बाहेर येतो व भाऊसाहेबांच्या खोलीत जातो. लगेच बाहेर येऊन दिवाणखान्यांतील कपबशा उचलून अंतर्गृहांत जातो. थोड्या वेळानें कोट हॅट काढून टायची गांठ सोडीत भालेराव प्रवेश करतो. कोरकेच्या शेजारीं बसून ) पैकू ! (दोन तीन सेकंदांनीं चहा व पोहे घेऊन पैकू प्रवेश करतो ) पैकू, बाई काय करताहेत रे?

**पैकू** :– बाई बाहेर गेल्या जी आत्तांच !

**भाले** ०:– (तुटकपणें) हुं !

**पैकू** :– (कोरकेकडे बोट दाखवून) साहेबांच्या शशीबाई आल्या होत्या त्याहिच्या सबं गेल्या !

**भाले०** :— शशी आली होती ? अच्छा ! – बरं जा !
**कोरके** :— आं ? ती इथं आली होती !

(पैकू परतं जातो)

**भाले०** :– अरे पैकू ! (तो पुन्हां परततो) कोणीकडे गेल्या रे बाई ?

**पैकू** :– मले मालूम नाही जी !

**भाले०** :– अस्सं ! – बरं जा ! (पैकू जातो. दोघेंहि फराळ करूं लागतात.)

**कोरके** :– (खातां खातां) कां हो ! ही कारटी कशाला आली असेल इथें ?

**भाले०** :– तोच विचार करतों आहें मी ! कालपासून तिच्यांत एकाएकीं बराच बदल झाला आहे ! होतां होईल तों टाळते आहे मला ती !

**कोरके** :– (थोडया स्तब्धतेनंतर) पण मला जरा काळजी वाटायला लागली आहे एका गोष्टीची ! (भालेराव जिज्ञासापूर्वक त्याच्याकडे पहातो) आपला सर्व बेत फसायचा एखादे वेळीं !

**भाले०** :– तो कसा काय ?

**कोरके** :– अहो, म्हणजे एखादे वेळीं सबनीसला या दोघी वाटेंत दिसायच्या, अन् तो जायचा भलतीकडे त्यांच्या बरोबर – म्हणजे सगळंच मुसळ केरांत !

**भाले** ०:–(विचार करीत) पैकू ! –(पैकू येतो)–अरे बाई पायीं गेल्या कीं मोटारनी रे ?

**पैकू** :– मोट्रीनं गेल्या जी ! डरायवरले थांबाले सांगितलं होतं त्याहिनं –

**भाले०** :– अस्सं ! बरं जा – (पैकू जातो)– मग तितकीशी भीति नाहीं त्यांची सबनीसशीं गांठ पडायची ! – नाहीं तर खरोखरच घोटाळा व्हायचा एखादा !

**कोरके** :– (थोडा विचार करून) बरं पण ते गुंडे विश्वासू आहेत ना ?

**भाले०** :– वाटतं तर खरं तसं ! (थोडया वेळानें हंसतो)

**कोरके** :– कां ? हंसलातसे !

**भाले०** :– (पुन्हां हंसत) विशेष कांहीं नाहीं ! – आपलं, गुंडे आणखी विश्वासू ! – या जोड कल्पनेचं हंसायला आलं ! –

**कोरके** :– विश्वासू असोत नाहीं तर नसोत ! –आपलं काम झालं म्हणजे संपलं ! –भयंकर माणूस आहे हो तो सबनीस – त्याच्या अनेक गुंडांशींसुद्धां ओळखी आहेत म्हणतात !

**भाले** ०:–त्याची नको काळजी ! —दाम रोख, काम चोख— दाम दुप्पट तर काम चटपट ! हें कोष्टक सहसा चुकत नाहीं आतां कोणत्याहि माणसाच्या बाबतींत !

**कोरके** :– पण सबनीसला कुठं लागू झालं तुमचं हें कोष्टक ?

**भाले०** :– हं :! —तो माणूस थोडाच आहे !

**कोरके** :– त्याचं एकदांचं निसन्तान झालं म्हणजे पहातों ती कारटी कुठं जाते ती ! –भयंकरच माजल्यासारखी झाली आहे हो ती अलीकडे ! –ऑफिस-मध्यें तर त्या दोघांची वागणूक काय झाली आहे ! – तिथं चार चौघांसमोर बोलतां येत नाहीं याचा तर वाटेल तसा फायदा घेतात ते ! (थोडा विचार करून) मला तर, खरं सांगूं,–भलताच संशय यायला लागला आहे तिचा ! (भालेराव त्याच्याकडे जिज्ञासेनें पहातो ) – म्हणजे, तुमच्या ध्यानांत नाहीं आलं ?

**भाले०** :–(ध्यानांत आल्यासारखा) ओ आय् सी ! – शक्य आहे बुवा !

**कोरके** :– ती घर सोडून गेली त्याच दिवशीं मला संशय आला ! म्हणून तर भाऊंच्या मागें लागलों एवढा तिला घरीं परत बोलावण्यासाठी !

**भाले०** :– पण भाऊसाहेबांना तर ती आतां प्रतिदेवताच वाटायला लागली आहे ! – नॉन्सेन्स् ! महामूर्ख आहेत हे सगळे गांधीवादी ! – आचार्य म्हणे ! – नसती पिडा व्हायला लागली आहे यांची अलीकडे ! – आतां तर समाजवादाच्या अन् वर्गभेद नष्ट करायच्या गोष्टी करायला लागले आहेत हे ! त्यांनीं एखादा राजकीय पक्ष नाहीं काढला अजून, नशीब !

**कोरके** :– आपल्याला तुमचं तें राजकारण अन् पक्ष हें कांहीं कळत नाहीं– पण एवढं मात्र वाटतं कीं इंग्रजांचं राज्य होतं तेंच बरं होतं ! – त्यांच्या राज्यांत सरकारी अधिकाऱ्यांनाच काय तो भाव होता ! –पण आतां! –आतां वाटेल तो खादीवाला स्वतःला सरकारी अधिकारी समजायला लागला आहे ! लोकशाही कसली ही ! – लफंगेशाही झाली आहे नुसती !

**भाले०** :– मला तर, कोणाच्या डोक्यावर खादी टोपी पाहिली कीं त्या डोक्याच्या आंत कांहीं तरी गडबड आहे असंच वाटतं ! सी. आय्. डी. मधला माणूस तर अगदीं निष्ठेनं खादी वापरतो !

(राम आणि रायभान घाईघाईनें आल्यासारखे दारांत उभे होतात. दोघांचेहि कपडे रक्तानें भरल्यासारखे दिसतात )

**राम** :—( दारांतूनच घाबरलेल्या आवाजांत ) साहेब !

**भाले०** :–कोण आहे ?

**राम** :– मी तो राम–जोशी– (रायभान त्याच्या मागोमाग आंत येऊन सलाम करतो)

**भाले०** :–(दचकल्यासारखा) अरे, हें रे काय !–तुमचे कपडे —

**राम** :– अहो साहेब, मोठा घात झाला !–सबनीसचं डोकं फोडलं हो कोणी तरी ( रडक्या आवाजांत ) अन् तो — [ बेशुद्ध पडला आहे ]

**भाले ०**:– (धक्का बसल्याचें सोंग करीत ) डोकं फोडलं ?–सबनीसचं ?– कोणी ?– अन् कुठं ?

**राम** :– अहो कोणी न् काय !– ताबडतोब त्याला हॉस्पिटलमधें नेला पाहिजे—

**भाले०**
**कोरके** } :— अरेरे !
च्-च्-च्-

**राम** :– साहेब तुमची गाडी देतां का हॉस्पिटलमधें न्यायला त्याला ?

**भाले ०**:–गाडी ! अरे गाडी बाहेर गेली आहे रे ! हाऊ सॅड ! तूं असं कर– ताबडतोब टेलिफोन कर ॲम्ब्युलन्ससाठीं ! जा, जा लौकर !–पळ ( निश्वास सोडतो )

**राम** :– (रडें कोसळल्यासारखा ) तोंपर्यंत तो जगतो कीं मरतो— [ कोण जाणे ]

**भाले०** :– अरे पण मग इथं थांबून काय होणार ? जा, जा लौकर !

**राम** :– साहेब, तिथं एक टॅक्सी उभी आहे, पण त्याला म्हटलं तर तो पेट्रोल खलास आहे म्हणाला ! एखादं पेट्रोल कुपन देतां का ?

**भाले०** :– कुपन ! पहातों हं !–शॉफरनं शिल्लक ठेवलं असेल तर ! (घाईघाईनें आंत जायला वळतो, पण पुन्हा परतून ) अरे, पण दुसऱ्याच्या गाडींत टाकायला मी कसं देऊं आपलं कुपन ?– टॅक्सीवाल्याची भरमसाट भाडं कमवायची युक्ति दिसते आहे ही ! हं : !–अन् नाहीं तर फुकटचं दोन गॅलनचं कुपन मिळालं !–आम्हांलाच तर पांच पांच रुपये गॅलनप्रमाणें कुपनं घ्यावीं लागतात,– ब्लॅक मार्केटमधें !

**राम** :– ( गयावया करीत) पण पहा ना असलं एखादं तर–

**भाले०** :– (घाईघाईनें आंत जात) थांब हं, पहातों ! (आंत जातो )

**कोरके** :– असं कसं मारलं रे त्याला कोणी ?– एकटाच होता का तो ?

**राय०** :– (राम खिसे चाचपडून दहा रुपयांची एक नोट काढीत असतो. म्हणून त्याच्याऐवजीं) अजी कोन जाने का झालं अन् का नाही ते ! एवढ्या भीडीमधी कोन सांगते जी ! अजी तव्हाच्या तव्हा आम्हास समजलं म्हून बेस झालं – नाही त ! – मोठा गजहब झाला जी !

**भाले०** :–( रामला एक कुपन देत) हं, घे हें – जा, पळ लौकर आतां !

**राम** :– (दहा रुपयांची एक नोट सेंटर पीसवर ठेवीत) ही ठेवा साहेब ! मी घेईन टॅक्सीवाल्याजवळून पैसे ! ( पळत जातां जातां ) केवढे उपकार झाले ! (दोघेंहि जातात)

**भाले०** :–( मोठ्यानें, त्यांच्यामागे ) अरे ए जोशी ! अरे रुपये कशाला !

**कोरके** :– (थोड्या वेळानें शुद्धीवर आल्यासारखा, नोट भालेरावला देत ) अहो ठेवा ही ! अन् पेढे काढा आधीं ! चांगली झाली – फार माजला होता साला !

**भाले०** :–(पॅंटच्या खिशांत नोट ठेवीत) सो ! – आफ्टर ऑल वुई हॅव सक्सीडेड, हं ! – पण एका गोष्टीचं वाईट वाटतं आहे मला – या वेळीं गाडी हवी होती घरीं !

**कोरके** :– कशाला ती ! – उगीच त्या मढ्याचा विटाळ !

**भाले०** :– चुकतांहात तुम्ही कोरके ! – अशा वेळीं त्याला मदत केल्यासारखं दिसलं असतं, चार चौघांत ! तुम्ही अगदींच क्रूड आहांत !

**कोरके** :– आहे खरा ! – तुमचं पॉलिश कांहीं और आहे !

( मॅजिस्ट्रेट, इन्स्पेक्टर रिंगे व पो० कॉन्स्टेबल प्रवेश करतात)

**भाले०** :– (दचकून) हलो ! – म्हणजे ! – आपलं, का हो !

**रिंगे** :– (कडकपणें) जस्ट वेट ! हे मॅजिस्ट्रेटसाहेब ! तुमची झडती घ्यायची आहे आम्हांला ! प्लीज् ! ( कॉन्स्टेबल शेजारीं ' अटेन्शन ' मधें उभा होतो. रिंगे भालेरावचे खिसे तपासूं लागतांच तो स्वतःच त्याला मदत करूं लागतो व खिशांतील नोट काढून त्याला देतो)

( राम व रायभान प्रवेश करतात )

**कोरके** :— *(त्यांना पाहून)* अरे, तुम्ही –! म्हणजे, काय भानगड आहे ही ?

**भाले०** :– (रिंगे नोट तपासून तिचा नंबर सीक्रट मेमोवर लिहून घेतो.

नंतर रामजवळून पेट्रोल कुपन घेतो व त्याचाहि नंबर सीझर मेमोवर लिहून घेत असतो. हा प्रकार पाहून) मिस्टर रिंगे ! कॉंग्रॅच्युलेशन्स् ! व्हाट् अ नीट ट्रॅप !

**मॅजि०** :– मिस्टर भालेराव, हें कुपन आपल्याच मोटारचं आहे ?

**भाले०** :– (निगरगट्टासारखा) तें सांगणं मोठं कठिण आहे !

**मॅजि०** :– म्हणजे, दुसऱ्यांच्या मोटारीचीं बरींचशीं कुपनं असतील आपल्याजवळ मग ?

**भाले०** :- आहेत की ! आपल्याला हवीं आहेत तीं ?

**मॅजि०** :- अर्थात् ( भालेराव आपल्या खोलींत जाऊं लागतो. त्याच्या बरोबर रिंगेहि जाऊ लागतो, अशा वेळीं शान्ताराम प्रवेश करतो. मॅजिस्ट्रेट-हि भालेरावच्या खोलींत जातो )

**कोरके** :– ( शान्तारामला पाहून ) अरे बापरे ! हा ब्रह्मराक्षस !

( भालेराव, मॅजिस्ट्रेट व रिंगे बाहेर येतात. रिंगेच्या हातांत १५।२० पेट्रोल कुपनांचें एक पुडकेच असतें. कुपनांचे नंबर रिंगे सीझरमेमोवर लिहूं लागतो.)

**मॅजि०** :– कशीं काय मिळालीं तुम्हाला ही इतकीं कुपनं ?

**भाले०** :– ( न बिचकतां हंसत ) अहो पाचपाच रुपयांना मोताद झालेले, मोडक्या मोटारींचे मालक पुष्कळ झाले आहेत गांवांत ! असलीं कुपनं विकून त्यांचा संसार चालतो ! माझी मोटार चालते !

**मॅजि०**:– पण हा गुन्हा फार गंभीर आहे हें तुम्हाला ठाऊक असायला पाहिजे !

**भाले०** :– हः हः ! त्या मोटार–मालकांची आर्थिक परिस्थितिहि फार गंभीर आहे हें तुम्हीहि जाणलं पाहिजे !– काय सबनीस ? आयॅम् अ स्पोर्ट्समन् ! शेक ! ( हात पुढें करतो. सबनीस तुच्छतापूर्वक ताठ उभा राहतो )-दॅटस् टू बॅड् !

**रिंगे** :– ( भालेरावला मेमोवर सही करायला सांगतो ) प्लीज साइन हिअर ! ( भालेराव सही करतो ) मिस्टर जोशी !– मिस्टर कोरके ! साक्षीदार म्हणून सह्या करा बरं !

**कोरके** :– ( राम सही करायला पुढें होत असतां केंविलवाणी मुद्रा करून )– मी ?

**रिंगे** :– ( उग्रपणें) यस् ! (कोरके घाबरत सही करतो. मॅजिस्ट्रेट सही करतो, अशा वेळीं पैकू अंतर्गृहांतून बाहेर येतो, पण ही मंडळी पाहून तोंड न फिरवितां पाठमोराच आंत अदृश्य होतो )अॅन्ड नाऊ मिस्टर भालेराव ! यू आर अन्डर अरेस्ट !– अर्थात् तुम्हाला जामीन मिळूं शकेल !

**भाले०** :– थँक्स् !–पण– ( इकडे तिकडे पहात )–पण जाण्यापूर्वी–

**कोरके** :—( रडकुंडीस आल्यासारखा ) भाऊसाहेबांना सांगून मग जा; घरीं कोणीच नाहीं दुसरं !

**रिंगे** :– ( भाऊसाहेबांच्या खोलींत जायला भालेराव वळतो इतक्यांत ) जस्ट् वेट् !– मिस्टर कोरके !– त्यांनाच जरा बाहेर बोलवा ना !

**शान्तू** :– ( कोरके आंत गेल्यानंतर भालेरावला ) भाऊसाहेबाची प्रकृति कशी काय आहे ?

**भाले०** :– ( सूडबुद्धीनें ) प्लीज् शट् अप् !– डेव्हिल !

**शान्तू** :– ( स्मित करीत ) सो ! द स्पोर्ट इज् गॉन् – अॅंड द मॅन इज् देअर ! अं !

**मॅजि०** :– (त्यांना हातानें थांबवीत) प्लीज् ! (स्मित करतो. कोरके आणि त्याच्या मागोमाग भाऊसाहेब प्रवेश करतात, भाऊसाहेब थकल्या-सारखे दिसतात. भालेराव व कोरकेखेरीज सर्व त्यांना नमस्कार करतात. शांतू त्यांना थोडा आधार देतो. त्याच्या आधारानें ते तख्तपोसाजवळ चालत येतात.)

**भाले०** :– ( कठोरपणें ) भाऊसाहेब ! तुमच्या कायद्याखालीं मला पकडलं आहे पोलिसनी !– बरं आहे, जातों मी !

**भाऊ०** :– ( हा प्रकार न उमगून ) माझा कायदा !– काय भानगड आहे ही ?

**भाले०** :– ( उपरोधपूर्वक ) तुम्ही कायदेमंडळाचे सभासद आहांत हें विसरलांत वाटतं !– पण माझं हेंच म्हणणं आहे कीं तुमच्या कायद्यानें कसाहि निकाल दिला तरी मी निर्दोषी आहे अशीच माझी मनोदेवता मला साक्ष देते !

**कोरके** :– ( अबुद्धिपुरःसर ) १९०८ सालीं टिळकांना शिक्षा झाली तेव्हां ते सुद्धां असंच कांहीसं म्हणाले होते ! ( डोळ्याला रुमाल लावतो )

**भाले०** :– अच्छा ! जातों मी ! ( रिंगेला ) चला !

( शांतू व भाऊसाहेबांखेरीज सर्व जातात. कोरके घुटमळत असतो त्याला रिंगे पुढें व्हायला सांगतो )

**भाऊ०** :– सबनीस ! काय भानगड आहे ही ? ( तख्तपोसावर बसतात )

**शान्तू** :– ( आदरपूर्वक, त्यांची काळजी वाटत असल्यासारखा ) भाऊसाहेब ! तुमचं मन तयार आहे का ? शांत आहांत ना ?

**भाऊ०** :– ( कांपऱ्या आवाजांत ) शांत आहे ! – प्रेमा कुठं आहे ?

**शान्तू** :– शशीबरोबर बाहेर गेली आहे ती ! मुद्दाम बाहेर नेलं आहे तिला शशीनं !

**भाऊ०** :–कां? तुम्ही कसे आलांत इथं ?– कधीं न येणारे ! – भालेरावना कशासाठीं पकडलं आहे ?

**शान्तू** :– (त्यांच्याकडे अनुकम्पेनें पहात ) भाऊसाहेब, काळजी करूं नका तुम्हीं ! मी सर्व साग तों सावकाश ! तुमचा विश्वास आहे ना माझ्यावर ?– सावध असाल तर सांगतों !

**भाऊ०** :–(मान हलवीत) अगदीं सावध आहे – तयार आहे !

**शान्तू** :– मी ॲन्टिकरप्शन डिपार्टमेंटच्या एका अधिकाऱ्याची मदत घेतली ! – काल म्हणालां होता ना तुम्ही ?– हुं: ! पण मीं आज जिवंत आहे म्हणून साधलं मला हें – माझा कट यशस्वी झाला ! – करावा लागला मला तो ! – तुमच्या दृष्टीनं हें असत्यहि असेल कदाचित् ! – पण या क्षणीं मी मेलों अशी बातमी आली असती कदाचित् तुमच्या कानावर !

**भाऊ०** :– (त्याच्या पाठीवर हात ठेवून) अरे अरे ! काय बोलतांहात तुम्ही हें ! तुम्ही चिरंजीव व्हा ! – तुम्ही जगायला हवं ! (स्तब्धता) मला तर सगळीकडे, आतां अंधार दिसायला लागला आहे ! (त्यांचा हात थरथर कांपूं लागतो )

**शान्तू** :– (काळजीच्या स्वरांत) भाऊसाहेब, तुमचा नोकर – काय नांव

त्याचं ? (तोंच पैकू प्रवेश करतो)—अरे पैकू ! भाऊसाहेब, तुम्ही कांहीं घेतां का ?

**भाऊ०** :—माझी रस घ्यायची वेळ झाली आहे—

**शान्तू** :—पैकू, जा बरं—घरांत आहे की नाही आणखी कोणीं ?

**पैकू** :—पडित आहे ना जी ! बाई बाहार गेल्या आहेत —

**भाऊ०** :—पैकू – जा पंडितला सांग, पाहुण्यांना चहा दे म्हणावं – अन् माझा रस आणून दे म्हणावं – जा !

**शान्तू** :— (पैकू जाऊं लागतो त्याला) अरे मला चहाबिही कांहीं नको—भाऊसाहेबांना रस आणून दे आधीं ! (पैकू जाधो ) बरं वाटत नाहीं का तुम्हांला ? आंत जाऊन पडतां का ?

**भाऊ०** :—बरं वाटतंय !—पण प्रेमा केव्हां येईल ? कुठं नेलं आहे तिला शशीनी ? — कशासाठीं नेलं ?

**शान्तू** :—तिला पाहवला नसता हा प्रसंग—उगीच भांबावली असती अन् तुम्ही संभाळूं शकलां नसतां तिला, म्हणून मुद्दाम बाहेर नेलं आहे तिला शशीनी ! आतां शशीनी तिचं मन हळूंहळूं तयार केलं असेल !—मी तुम्हांला हें सगळं सांगायलाच मुद्दाम थांबलों इथं ! ( पैकू अंतर्गृहांतून येतो व भाऊसाहेबांच्या खोलींत जातो )

**भाऊ०** :—तुम्ही अन् शशी किती समजदार आहांत ! किती माणुसकी आहे तुमच्यांत !—माझी प्रेमा अगदीं भोळी आहे ! फार अल्लड आहे ती !—म्हणूनच तिची निवड चुकली, सबनीस !

**पैकू** :—(भाऊसाहेबांच्या खोलींतून रसाचा ग्लास घेऊन येतो. तो भाऊसाहेबांना देत ) बाईसाहेबांनीं तय्यार करून ठेवला होता जी गिलास तुमच्या खोलींत !

**भाऊ०** :—शाबास ! आतां साहेबांसाठीं चहा घेऊन ये जा !

**शान्तू** :—अरे मला खरंच चहा नको आहे !—ग्लासभर पाणी आण जा – ( पैकू जातो )

**भाऊ०** :—( रसाचे दोनतीन घोंट घेऊन) माझ्या पश्चात् तुम्ही काळजी घ्या बरं प्रेमाची ! (स्तब्धता) भालेरावबर कसलंच नियंत्रण घालणं मोठं कठिण काम आहे ! कालपासून तर अगदीं भूत संचरल्यासारखे झाले आहेत

ते ! आतां वरून तुम्ही हा हल्ला चढवलात ! – त्यांना जामिनावर सोडतील का ?

**शान्तू** :— सोडतील – पण त्यांना नोकरीवरून तात्पुरतं बडतर्फ मात्र करण्यांत येईल ! शिवाय – शिवाय त्यांच्या गैरहजेरींत, आमच्या खात्यांत आतांपर्यंत त्यांनीं केलेली बऱ्याचशा मालाची चोरटी विक्री– लुचपतखोरी– सगळंच बाहेर येईल आतां हळूंहळूं ! त्यांचे कांही सोबती, एके काळचे त्यांचे साथीदार – तेसुद्धां उलटतील आतां त्यांच्यावर ! – बऱ्याच भानगडी होणार आहेत आतां !

**भाऊ०** :–म्हणजे आतां – आतां मोठीच लढाई – लढाईलाच तोंड देण्याचा प्रसंग आहे प्रेमावर ! ती हें सारं कसं सहन करील कोण जाणे ? मला तर सगळीकडे अंधार दिसतो आहे ! (थांबून पुन्हा रसाचे दोन घोट घेतात) मरणापूर्वी बापूना अंधार दिसू लागला होता – पण त्यांनीं जगण्याची आकांक्षा तत्काळ सोडून दिली ! – ते मृत्यूला सामोरे झाले !

**शान्तू** : – लोकोत्तरच पुरुष होते ते !

**भाऊ०** : – (थकल्यासारखे) खरं आहे ! (सावकाश बोलत जातात), त्यांचं मन, त्यांच्या जीवनाचा आकार, त्यांचं तत्त्वज्ञान – सारं आकाशासारखं होतं ! सारं विश्व मावेल एवढं होतं त्याचं तत्त्वज्ञान ! पण आम्ही – स्वत:ला त्यांचे अनुयायी म्हणवणारे आम्ही–आपल्या लहानशा जीवनाच्या मापट्यांत त्यांचं तत्त्वज्ञान ओतायला पहातों ! – त्यांच्या नांवाला बट्टाच लावतों आम्ही ! आमच्या मापटभर तत्त्वज्ञानांत तारकशक्ति कुठून येणार ! –(स्तब्धता) भालेरावनी फार दुरुत्तरं दिलीं मला काल ! मी उलटून बोललों नाहीं त्यांना–पण आंतल्या आंत माझा दाह होत होता ! –मी त्यांना मनापासून क्षमा नाहीं केली ! (निश्वास सोडून) आम्ही इतो भ्रष्ट ततो भ्रष्ट झालों आहोंत ! – तुमच्यांत बंडखोरी आहे, जिजीविषा आहे! –पण मी –जगावंसं वाटत असून मी थकलों आहे ! – छे छे ! थकलों असून जगावंसं वाटतं आहे मला ! हुं: ! (पैकू चहाचें ट्रे व ग्लासभर पाणी घेऊन येतो. त्याच्याकडे पाहून) चहा आणलास ना ! शाबास ! (त्याच्याकडे प्रेमळ नजरेनें पहात) पैकू मोठा आधार आहे माझा, सबनीस ! (पैकू लाजून घरांत जातो)

**शान्तू** :- ( पाणी पिऊन, चहा घेण्यापूर्वी, स्मित करून ) हं : ! – तो तुमचा आधार आहे खरा – पण त्याचं जीवन ! त्याचं तत्त्वज्ञान !– गांधी-जींच्या तत्त्वज्ञानाचा एक बिंदु तरी मावूं शकेल का त्याच्या मापट्यांत ! हं: ! ( उसासा ) असा हा पैकू तुमचा आधार आहे अं ?

**भाऊ०** :– ( भेदरल्यासारखे त्याचेकडे पहात ) मोठा भयानक आहे हो हा विरोध !

**शान्तू** : -फारच भयानक !–तुमच्यासारख्या वेदोनारायणांना वास्तविक दरिद्रनारायणांचाच आधार आहे आज ! आजच्या मोठ्यांचं मोठेपण लहा-नांच्या आधारावर ! ( शून्यांत पहात ) उद्यां जर लहानांना थोर होण्याची संधि मिळाली तर आजच्या थोरांचं थोरपण बेकारच होईल ! आजच्या बेकारांना –( उसासा सोडून ) बरं तर, भाऊसाहेब, मला जायला हवं ! ( उठून नमस्कार करतो. जाऊं लागतो. पण पुन्हा परतून ) भाऊसाहेब, कधीहि गरज पडली– ( त्याची पाठ दरवाजाकडे असताना प्रेमा व शशी दारांत येऊन उभ्या होतात. त्याचें तिकडे लक्ष नसतें )–तर प्रेमाला सांगा, मला निरोप पाठवायला मुळींच अनमान करूं नकोस म्हणावं–जातों हं मी–नमस्कार ! ( दरवाजाकडे वळतो. दोघींना पाहून थबकतो ) अरे ह्या तर आल्याच ! ( पुढें जात ) चल शशी ! गेलं पाहिजे आपल्याला ताबड-तोब ! ( तिचा हात धरून बाहेर जातां जातां ) बरं प्रेमाताई ! भाऊसाहे-बांना नीट जपायचं हं !

( शशी व शान्तू बाहेर जातात )

**प्रेमा** :– ( तिचे डोळे रडून लाल झाल्यासारखे दिसतात. धांवत जाऊन भाऊसाहेबांच्या मांडीवर लोळण घेत ) भाऊ ! ( रडूं लागते. अशा वेळीं )

[ पडदा ]

# अंक चौथा :

( स्थळ तिसऱ्या अंकाचेंच, पडदा वर जातो त्या वेळीं भालेराव टेबला-समोर बसून लिहीत असतो. त्याची पाठ आपल्याकडे असते. अर्ध्या-पाऊण मिनिटांनंतर भाऊसाहेबाच्या खोलींतून एक डॉक्टर स्टेथॉस्कोप गळ्यांत अडकवून बाहेर येतो. त्याच्या मागोमाग पंकू त्यांची बॅग आणि ब्लडप्रेशर गेज घेऊन येतो व घराबाहेर जातो)

**भाले०** :–( त्याचें बोलणें अगदींच [कामापुरतें असल्यासारखें तुटकसें असतें) हं काय म्हणतात पेशन्ट तुमचे ?

**डॉक्टर** :– ठीक आहे – तसा धोका कांहींच नाहीं त्यांना – पण मनस्ताप मात्र कसलाच करून घेतां कामा नये त्यांनीं – हो, नाहीं तर मेंदूंत रक्तस्राव व्हायची भीति ! आहाराची काळजी, तशीच पूर्ण विश्रांति घ्यायला हवी त्यांनीं ! (आठवल्यासारखें )— खरंच आज निकाल लागायचा होता ना तुमच्या केसचा ?

**भाले०** : – हो ना –! (रिस्टवॉचकडे पाहून ) वाटच पहातों आहे कोर्टी-तून काय निरोप येतो त्याची ! — पावणेबारा झाले ! —

**डॉक्टर** : — म्हणजे माझ्या मेडिकल सर्टिफिकेटचा उपयोग झाला म्हणायचा !

**भाले०** : – झाला तर ! मेनी थँक्स ! म्हणून तर घरीं राहूं शकलों ! एरव्हीं निकाल ऐकायला कोर्टीत जावंच लागलं असतं ! — पण होतोय कीं नाहीं कोण जाणे !

**डॉक्टर** :— काय होईलसं वाटतंय ! पुरेसा पुरावा देतां आला नाहीं म्हणतात पोलिसला !

**भाले०** :– तें खरं – पण कांहीं झालं तरी कोर्ट म्हणजे जुगारच असतो !

**डॉक्टर** : –तशी उपाध्येसाहेबांची न्यायनिष्ठुरतेबद्दल ख्यातीच आहे ! – उपाध्यांच्याच कोर्टांत केस गेली, नशीबच !

**भाले०** : – तरीसुद्धां नेम काय ?

**डॉक्टर** : – मग जरूर पडल्यास अपीलची तयारी ठेवली असेलच तुम्ही ? तेंच लिहिणं चाललं आहे वाटतं ?

**भाले०** :– छे छे ! हें लिहिणं भलत्याच विषयावर चाललं आहे ! — उद्यां रेडियोवर भाषण ठेवलं आहे ना माझं ! – जवळजवळ एक महिन्या-पूर्वी — म्हणजे ही केस सुरूं होण्यापूर्वींच — कॉंट्रॅक्ट करून बसलों होतों रेडियोशीं ! – मी म्हटलं, केसचा निकाल होईपर्यंत कशाला कॅन्सल करा ! – हिंदुस्थानच्या औद्योगिक पुनर्घटनेचा प्रश्न आहे ! – तोच विषय घेतला आहे मी भाषणासाठी ! — बसलों आहे आतां फॅक्ट्स् अन् फिगर्स घेऊन ! —

**डॉक्टर** :– मोठे उद्योगी आहांत बुवा तुम्ही !

**भाले०** :– उद्योगी कसला ?– म्हटलं आहे ना ! — 'गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत' तुम्ही नाही का, अगदीं साधी केस असली तरी सीरियस समजून तिची चिकित्सा करीत ?

**डॉक्टर** :–हॅं: हॅं: हॅं: ! – खरं आहे ! अगदीं खरं आहे ! अच्छा विश यू सक्सेस !

**भाले०** :– मेनी मेनी थॅंक्स !

**डॉक्टर** : –( जातां जातां ) उद्यां येईन पुन्हा – मिसेस भालेराव जरा नर्व्हस झालेल्या दिसताहेत ! स्वतःच्या घरची केस असली कीं सगळे डॉक्टर नर्व्हस होतात – हः हः ह !

**भाले०** :– हो ना– येत जा वरचेवर (डॉक्टर जाऊं लागतो) नमस्कार! – थॅंक्यू सो मच् ! – ( डॉक्टर जातांच लिहूं लागतो. थोडया वेळानें रिकाम्या हातानें पैकू प्रवेश करतो. त्याच वेळीं भाऊसाहेबांच्या खोलींतून प्रेमा डोकावते )

**भाले०** }<br>**प्रेमा** } :— पैकू

**पैकू** :–( दोघांनाहि ) जी !

**भाले०**:-( मागें वळून प्रेमाकडे पहातो. नंतर पैकूला तुटकपणें ) कांहीं नाहीं जा, बाईसाहेब काय सांगताहेत तेंच कर.

**प्रेमा** :- ( खोलीच्या बाहेर पडून खिन्नपणें पैकूला ) असूं दे - मीच करतें ! ( पैकू जागच्या जागीं ताठ उभा राहतो )

**भाले०** :-( ती अंतर्गृहांत जायला वळली असतां ) कां ? ( ती थांबते)- तो तुझा नोकर आहे ! ( पैकूला ) पैकू जा लवकर ! ( तरी तो उभाच असतो )- गेटाऊट !

**प्रेमा** :-(पैकू चिडलेला दिसतो, त्याला संथपणें) जा, भाऊंचं आंघोळीचं पाणी तापलं आहे का पहा बर ! नसेल तर बंबांत ढलपे टाक थोडे, जा ! ( पैकू घरात जातो. तो जातांच टेबलाजवळ जाऊन भालेरावच्या विचित्र वागणुकीवर निश्चयाच्या पण सौम्य शब्दांत टीका करण्यासाठी) का, काय झालं त्याच्यावर भडकायला ?

**भाले०** :-(तिच्यावर रागवावें कीं गप् बसावें हें न ठरल्यामुळें थोड्या चढ्या आवाजात उपरोधानें) त्याच्यावर भडकायला 'मला' काय झालं !- बरोबर आहे ! तो 'तुझा' नोकर आहे !- (आवाज आणखी चढवून ) खरं म्हणजे या घरांत रहायचा 'मला' काय अधिकार आहे !— हें घर 'तुझं' आहे !- लुक हिअर, आयॅम् गोइंग !— ( आपल्या खोलीकडे वळतो, पण पुन्हा परतून टेबलावरचे कागदपत्र उचलूं लागतो. अशा वेळी प्रेमा त्याच्या खोलीच्या दारांत जाऊन उभी होते.)

**प्रेमा** :—(तो दाराशीं येतांच) कुठं चाललांत ?- कां म्हणून चाललांत?

**भाले०** :— खुशी माझी !— सारं जग मोकळं आहे मला !

**प्रेमा** :- पण मी कोणचं पाप केलं आहे— मला सोडून जाण्यासारखं ?

**भाले०** :-(त्याचा श्रेष्ठपणा मान्य केल्यामुळें बेफिकीर होऊन उपरोधानें हंसत ) तुझं पाप ? हं ! मोठी थोरली यादीच द्यावी लागेल तुझ्या पापांची!

**प्रेमा** :--( हट्टाला पेटल्यासारखी तुटकपणें ) तरी पण—?

**भाले०** :- या गेल्या महिन्यांत काय करायचं शिल्लक ठेवलं आहेस तूं !— तूं त्या सबनीसच्या कटांत सामील झालीस ! तुझ्या नांवावर बँकेंत पैसे जमा करत होतों त्या वेळीं माझी साथ करीत होतीस !— पण त्याच्या कटांत सामील झाल्यापासून एकेका पैसाठीं माझी नाकेबंदी केलीस !— त्या

बनियापासून गुप्त पोलिसासारखी माझ्याविरुद्ध माहिती गोळा केलीस ! — अन् मला खड्ड्यांत टाकायला ती सर्व माहिती त्या सबनीसला पुरवलीस ! उद्यां जेलांत गेलों तर तुला मात्र उजळ माथ्यानं हिंडतां यावं म्हणून घरांतल्या नोकरासमोर सदाचरणावर मला महिनाभर व्याख्यानं झोडलींस ! ( न पटणारी गोष्ट पटविण्यासाठीं उसना आवेश आणून ) हुंः ! उद्यां मी डोळ्याआड झाल्यावर त्या सबनीसबरोबर 'प्लॅटॉनिक' प्रेमालाप कशावरून करणार नाहीस ?

**प्रेमा** :—(डोळे मिटून कान बंद करून घेते. थरथर कांपत) काय पुरावा आहे तुमच्याजवळ, हे असले घाणेरडे आरोप करायला ? ( तिच्या डोळ्यांतून दोन टिपें गळतात ) तुम्हांला खड्ड्यांत टाकायला पुढं झालें मी ! जिभेला थोडा तरी लगाम घाला ! ( स्फुंदूं लागते ) काय पुरावा आहे तुमच्याजवळ ? —

**माले०** :— हः हः हः ! पुरावा ? पुराव्याची चलाखी तूं शिकवतेस मला! — ते ! — ते पुराव्याचे पाट वहायला लागले आहेत ना एवढे तुझ्या डोळ्यांतून— त्याचं नांव काढतांच ! — हुंः — मघांपासून दोनदां सांगितलं त्या गधड्याला, कोर्टांत जाऊन चौकशी कर म्हणून ! — त्याला फुरसद कुठं आहे ! — वेळी अवेळीं तुझ्या चिठ्ठ्याचपाट्या त्या सबनीसकडे घेऊन जायला मात्र त्याला हवी तेवढी फुरसद सांपडते ! — पुरावा हवा ! चल हो बाजूला ! ( तिला धक्का देऊन तो खोलींत जाणार अशी धास्ती वाटून ती बाजूला होते, आणि मन घट्ट करून धाडकन् कोचावर जाऊन बसते. तो आंत जातो. )

**पैकू** :— ( प्रवेश करून ) आत्तां धा मिनिटांत तापते जी पानी !

**प्रेमा** :— ( त्याच्याकडे न पहातां, निश्चयी स्वरात, पण संथपणें ) बरं— पैकू, कोर्टांत जाऊन वकीलसाहेबांना विचार बरं, केसचा निकाल अजून कसा कळला नाहीं, विचारताहेत म्हणावं साहेब.

**पैकू** :— जी हो ! ( बाहेर जाऊं लागतो )

**माले०** :— ( कोट टोपी घालून बाहेर येतो ) असूं दे ! — कांहीं अडलं नाहीं ! ( पुन्हां खोलींत जातो. पैकूचा भडका उडालेला दिसतो )

**प्रेमा** :— ( थोड्या वेळानें पूर्ववत् ) जा बरं, पैकू—

**पैकू** :- जी हो ! ( बाहेर जातो )

**भाले०** :– (थोडया वेळानें कोटटोपी काढून बाहेर येतो.) आतां लढाई करायचं पक्कंच ठरवलं आहेस वाटतं ! – ठीक झालं ! (शेजारच्या सोफावर झटक्यांत बसून ) कमॉन् ! – काय म्हणणं आहे तुझं ? (ती स्तब्ध असते ) आतां कां बोलत नाहींस ? ( तरीहि ती स्तब्धच ) हं ! ( उठून फेऱ्या घालूं लागतो. मधेंच थांबून ) मी जाणार नाहीं असं समजूं नकोस हं ! – या केसचा निकाल – अखेरचा निकाल झाला कीं या घराचा माझा संबंध संपला ! इथल्या साऱ्या विसंगतीची – साऱ्या थोतांडाची किळस आली आहे मला अगदीं !

**प्रेमा** :– (त्याच्याकडे न पहातां) कुठल्या पुण्यक्षेत्रांत जाणार आहांत ?

**भाले०** :– मसणांतल्या ! – तुझा काय संबंध ? माझा खाजगी प्रश्न आहे तो !

**प्रेमा** :– ( कठोरपणें ) मुळींच नाहीं – माझाहि संबंध आहे त्याच्याशीं! भूतकाळांत तुमची सांथ केली आहे ना मी तुमच्या वाकडया मार्गावर ! ( तो तिच्याकडे जिज्ञासेनें पहातो ) — भविष्यकाळांत तुमचा संबंध सोडणं कसं शक्य आहे ! – मसणाच्या वाटेवर आडवं व्हायचं ठरवलं आहे मी !

**भाले०** :– ( कुत्सितपणें ) अच्छा ! पोलिसच्या लॉरीसमोर आडवी होऊन सत्याग्रह करणार आहेस वाटतं ! ओ हो !

**प्रेमा** :– ( ओंठ चावून दगडासारख्या निश्चलपणें ) तिथून सुटून यालच ना एक दिवस ! – त्या दिवसापासून – त्या क्षणापासून !

**भाले०** :- डोन्ट बी अ फूल ! हंः ! माझा आजपर्यंतचा मार्ग अगदीं सरळ होता ! – म्हणूनच तूं माझी साथ केलीस ! तुला कळत नव्हता माझ्या अर्थशास्त्राचा सरळ अर्थ ? आतां जें नवीन अर्थशास्त्र मला शिकवते आहेस त्याचा अर्थ तुला तरी कळतो का ? माझ्याच सरळ मार्गाचा अवलंब तूं करशील ! उद्यां त्याच मार्गावर चालूं लागशील ! – आय् बेट्– पहाशील मी काय सांगतों आहे तें !

**प्रेमा** :– आतां कालत्रयीं शक्य नाहीं तें ! मीं वचन दिलं आहे भाऊंना ! या केसवर अखेरचा पडदा शक्य तितक्या लौकर पडावा म्हणून देवांना नवस केला आहे – [ कीं तुम्ही सुटून येतांच – ]

भाले० :— ( एकदम शुद्धीवर आल्यासारखा ) देवांना ! — नवस केला आहेस ? (एकदम खोलीकडे वळत ) बस् झाला हा देवांचा जुलूम ! या क्षणीं चाललों मी या देवघराबाहेर ! ( खोलींत जातो )

( पैकू प्रवेश करतो व प्रेमाला एक चिठ्ठी देतो )

पैकू :— वकीलसाहेबांच्या कारकुनानं देल्ही जी — रस्त्यांत भेटले ते —

प्रेमा :— (घाईघाईनें चिठ्ठी वाचते. तिच्या मनाची एकाएकीं तारांबळ उडालेली दिसते. उठून घरांत जातां जातां ) साहेबांना दे, जा. ( घरांत जाते. पैकू चिठ्ठी घेऊन घुटमळत उभा रहातो. भालेराव कोटटोपी घालून व ब्रीफकेस घेऊन घाईघाईनें येतो. पैकू त्याला चिठ्ठी देतो. ती चिठ्ठी तो वाचत असतां पैकू मागें पहात पहात जाऊं लागतो. इतक्यांत आंतून प्रेमाची किंकाळी ऐकूं येते ) अहो भाऊ ! ( किंकाळी ऐकतांच भालेराव एकदम बाहेर जाऊं लागतो. त्याची ही विचित्र वागणूक पाहून तो दरवाजांत चटकन आडवा होतो. आंतून पुन्हां किंचाळी ऐकूं येते) भाऊ ! देव कुठं गेले आपले ?

भाले० :— माझी कोंडी करतां काय ? (टेबलावर ब्रीफकेस आपटून आपलें तोंड टेबलावर झाकून खुर्चीवर घट्ट बसतो )

प्रेमा : — (बाहेर येऊन घाबरल्यासारखी ) अरे बापरे ! आपले देव कुठं गेले ? (भालेराव निश्चल बसला आहे हें पहातांच तिला त्याचा जबरदस्त संशय येतो. त्यासरशीं ती त्याच्या अंगावर जवळ जवळ चवताळू-नच जाते व त्याचे खांदे धरून हलवीत) कुठं गेले आपले देव ? ( किंचाळून) काय ? ( त्याच्या हालचालींवरून तो पश्चात्तापामुळें हुंदके देतो आहे असें तिला वाटतें ) आतां रडायचं सोंग कशाला करतोस करून ? ( समोर येत असतां चीड, दुःख, किळस इत्यादि भावनांनीं बोबडी वळल्यासारखी एकेक शब्द उच्चारते ) आई ग ! देवा रे ! किती पिढ्यांचे देव ! — सोन्यासारखे – सोन्याचे ! —( तिचे डोळे विस्फारत जातात ) शंभर तोळे सोनं ! बारा हज्जार रुपये ! — कुठं नाहींसे केलेस ? ( पैकू दाराबाहेर उभा असतो तो चटकन् अदृश्य होतो )

भाले० :-( विजयाचा राक्षसी आनंद होऊन ) देवर ! देवर ! तें बघ ! काय गेलं म्हणालीस ? हाः हाः हाः ! देव गेले ! ! देव गेले की रुपये ! ! ! बारा हज्जार रुपये ! ! ! हाः हाः हाः ( प्रेमा पराजित होऊन तक्तपोसावर

लोळण घेते व तोंड झांकून हुंदके देऊं लागते. भालेराव तिच्याजवळ येऊन उभा होतो. भाऊसाहेब हातीं सोटा घेऊन त्याला टेंकून पडद्यामागें आपल्या खोलीच्या दरवाजांत उभे होतात. त्यांच्या डोक्यावर ओल्या फडक्याची घडी असते )हेंच- हेंच बरं माझं सरळ अर्थशास्त्र ! हाच तो माझा सरळ मार्ग ! आलीसच कीं नाहीं माझ्या सरळ मार्गावर ! अखेर देवाच रुपये-आणे-पैतच मोजमाप केलंस ना तू ! – देव गेल्याचं दुःख नाहीं झालं तुला! दगडाचे देव गेले असते तर नसता फुटला तुला इतका पाझर ! – हात् तुमचा देव !! हः हः हः !

**प्रेमा** : – ( उठून किंचाळते ) शटप् यू डेव्हिल ! ( पुन्हा लोळण घेऊन रडूं लागते ) आई ग !

**भाले०**:— (बेरडासारखा भावनाशून्य भाषा बोलूं लागतो )तरीसुद्धां मीच डेव्हिल, अं ? आणखी तूं ? देवता ! काय अन्याय आहे पहा ! अग आपण दोघेंहि एकसारखेच आहोंत हें लौकर कबूल कर ! देवावरची आपली भक्ति – म्हणजे विभक्तीच ती ! – विभक्तीचे आपले प्रत्यय थोडे वेगळे असतील ! पण त्या नाममात्र देवांचं सामान्यरूप ! तें दोघांना सारखंच ! तू गुळाच्या देवा'ला' नवस बोलली होतीस. मी गुळाच्या देवा-'चा' नवस बोललों होतों ! उपाध्याच्या पोटाला गूळ एकसारखाच ! उगीच नाहीं उपाध्येसाहेबांनीं मला मुक्त केलं ! खरं म्हणजे तुझ्या सोन्या-च्या देवांचं सोनंच झालं ! हः हः हः ! ( तिचे खांदे धरून तिला उठवूं लागतो) हं, प्रेमा ऊठ– चल उघड झांकली मूठ ! 'मनी' मावशी पिवशीं-तून बाहेर पडल्यावर पुरे झाली ही जम्मत ! (ती आपले खांदे झटकून दूर होते. तत्क्षणीं त्याच्या मनांत एक थोडा भीतिप्रद विचार येतो. म्हणून थोडा चचकल्यासारखा )म्हणजे ? पोलिसमध्यें रिपोर्ट वगैरे देणार आहेस की काय आतां ? (लगेच ती भीति नाहींशी झाल्यासारखा ) रिपोर्ट कसला देतेस म्हणा ! आतां फार तर 'घराबाहेर' ! घराबाहेर जाऊन व्यक्ति-विकास ! अन् चार आठ दिवसांनीं पुनश्च हरिः ओम् ! हो ! घरांत काय अन् घराबाहेर काय ! आपल्या देवाच्या कल्पना सगळीकडे सारख्याच ! ! मग कशाला हा नाट्यावेश उगीच ! भाऊसाहेबांचं तें सत्य ! ती अहिंसा ! ती शान्तू– ती कामगार चळवळ– ती क्रांति – ऑगस्टमधली असो नाहींतर

ऑक्टोबरमधली असो – अग, ती कादंबरी होती एक — एक अद्‌भुतरम्य असा, गोडसा ‘ अपघात ’ होता तो तुझ्या, सुवर्णमध्याच्या, सरळ मार्गावरचा ! खरं म्हणजे सोनं हाच आपला देव आहे हें लौकर ओळख ! – गोंडस नांव देऊन लिमिटेड बंधूंची एखादी कंपनी काढू – अन्‌लिमिटेड सोनं जमवूं – पुन्हां देऊं त्या सोन्याला देवाचा आकार ! हं, चल ऊठ बरं लौकर ! उपाध्येसाहेबांकडे गेलं पाहिजे ताबडतोब त्यांचे आभार मानायला ! – अग लुचपत खाऊनच्या खाऊन तिच्याशीं बेइमानी न करणारा न्यायाधीश मिळायला नशीब लागतं आजकाल ! ( तिला पुन्हां हालवूं लागतो )

**भाऊ०** :– (सोटा टेंकत टेंकत पुढें येत) कुठं घेऊन जाणार आहांत तिला? (त्यांच्या आवाजांतील कंप वाढू लागतो) नरकांत? आपल्या पापांवर पांघरूण घालायचंच होतं तुम्हांला, तर देवांशिवाय कांहीं सांपडलं नाहीं तुम्हांला दुसरं तिसरं ?आतां आणखी तिला कुठं घेऊन जाणार आहांत आपल्याबरोबर ? (आवाज चढवून) सैतान आहांत की—( एकदम चूप होऊन थोडया वेळानें हलक्या स्वरांत) माफ करा ! निघू नये तो अपशब्द निघून गेला माझ्या तोंडून–(प्रेमाजवळ बसून तिला कुरवाळूं लागतात)

**भाले०** :– नॉट्‌ अॅटॉल ! उलट एकदां तरी खर बोललांत माझ्याशीं म्हणून आदर वाटूं लागला आहे मला आतां तुमच्याबद्दल !

**भाऊ०** :– ( उसासा सोडून गहिंवरल्यासारखे ) काय खरं बोललों मी ?

**भाले०** :– हेंच कीं थोडं तारतम्य पाळलं तर पापांवर पांघरूण घालण्यासाठीं दिलेली लांचलुचपत तुम्हांलासुद्धां फारशी गैर वाटत नाहीं ! (भाऊसाहेब निश्वास सोडतात ) फक्त पवित्र वस्तूचा तसा उपयोग करूं नये एवढंच तुमचं म्हणणं! (क्षणभर थांबून)––पण खरं म्हणजे हा तुमचा नियम तुम्ही कधींच सैल करणार नाहीं असंहि नाहीं !––पवित्र वस्तूंचा अगदीं बाजार बसवणारा जर एखादा भूदेव असेल तर मग तो बाजारसुद्धां तुम्हांला मान्य होतो !

**भाऊ०** :– कशाला भलभलते आरोप माझ्यावर करण्यासाठीं आपली जीभ झिजवतां उगीच ! कोणत्या पवित्र वस्तूचा बाजार मीं मान्य केला ?

**भाले०** :– सांगूं ? सैतानाला सैल सोडताहांत बरं ? तुम्हीच सांगा— महात्मा गांधींच्या पवित्र अस्थींचा जो बटवडा जमभर करण्यांत आला, नि

हप्त्याहप्त्यांनीं त्यांचं जे विसर्जन करण्यांत आलं, त्याला आधार दाखवा बरं एका तरी शास्त्रवचनाचा ! गांधीजींच्या आत्म्याला तरी आवडला असेल का हा तमाशा ? पण तो तमाशा करणारे भूदेव होते ना ! त्यांचा राजकीय बाजारभाव वाढणार होता ना ! म्हणून तुम्ही हा अधर्म सहन केलात ! नव्हे. तुम्ही या असल्या अशास्त्रीय विसर्जनाच्या प्रसंगीं स्वाहा-काराचे मंत्रोच्चार केलेत ! मग मलाच का नांवं ठेवतां ? हुंः ! न्याय-देवतेचं प्रेम बसलं तुमच्या देवांवर अन् असल्या 'कोटिंग'चा कुणाला संशयसुद्धां येणार नाहीं असा तिला विश्वास वाटला ! मग समाजांत माझा बाजारभाव टिकवण्यासाठीं मीहि म्हटलं 'न्यायदेवतायै स्वाहा !' तर बिघडलं कुठं ?

**भाऊ०** :– आतां ब्रह्मराक्षसच ब्रह्मविद्या शिकवूं लागला आहे !

**भाले०** :–डॅट्म् इट् ! असें माणसांन येऊन शिवीगाळ करा थोडी ! नुसते धर्ममूर्ति बनून आपल्या तत्त्वज्ञानाचा रथ धरित्रीच्या वर हवेंत चालवणं सोडा थोडं ! ( थाबून ) पण आतां फार उशीर झाला तुम्हांला ! वय झाल्यावर दुबळेपणामुळ चिडलेला संतापी दुसऱ्याचं डोकं नाहीं फोडूं शकत !—उलट त्याच्या स्वतःच्याच डोक्यांत रक्तस्राव होऊन त्याचाच पक्षघात होतो !

**भाऊ०** :– आतां माझा पक्षघात झाला काय, अधःपात झाला काय, देह-पात झाला काय !—माझं काहीहि झालं तरी सत्य अजरामरच राहील ! ( थोडे उसळून ) तुम्ही केलेल्या पाठभेदामुळे तें अपभ्रष्ट होणार नाहीं, समजलात !

**प्रेमा** :– ( स्फुंदत भाऊसाहेबांना )-- कशाला भाऊ त्याच्याशीं–!

**भाले०** :–( अनावर होऊन ) सत्य अर्थातच अजरामर राहील; पण कोणचं सत्य ? तुमचं कीं इतिहासाचं ? इतिहासाचं सत्य कोणावर प्रेम करत नाहीं—कोणाशीं पक्षपात करत नाहीं !—ऐतिहासिक सत्याला हिंसा नाहीं, अहिंसा नाहीं ! अन् म्हणूनच तें अजरामर राहील !—पण तुमचं सत्य! तुम्हांला सत्यहि हवं अन् प्रेमहि हवं !—प्रेम करणाराला पक्षपातच करावा लागतो !—अन् म्हणूनच तुम्ही सत्याच्या कितीहि बढाया मारल्यात तरी पक्षपातच करतां ! –अहिंसेचा आक्रोश करत हिंसेकडे कानाडोळा करतां !

**भाऊ०** :– कोणाशीं पक्षपात केला ? कोणाच्या हिंसेकडे कानाडोळा केला मी ?

**भाले०** :–पक्षपात – पावित्र्याचं विडंबन करणाऱ्या त्याच भूदेवांशीं !– कानाडोळा, त्याच भूदेवांच्या हातून घडणाऱ्या हिंसेकडे ! भूदेवाना अन् भूदासांना एकाच पंक्तीला बसवण्याचा संकल्प अगदीं उच्च स्वरांत सोडणारे तुम्ही— तुम्हीच सांगा बरं, भूदेव भूदासांच्या पंक्तीला बसायला तयार आहेत आज ? आपल्या देशांत स्वातंत्र्याच्या अमृताची गरज जशी भूदेवांना तशीच भूदासांनाहि— सर्वांनाच एकसारखी गरज वाटत होती ना ? पण तें अमृत प्राप्त कसं झालं ?

**भाऊ** ०:– एवढं कोडं कसलं आहे त्यांत ? देवांनीं आणि दानवांनीं एकत्रित होऊन समुद्रमंथन करून अमृत मिळवलं तसंच इथंहि भूदेवांच्या नि भूदासांच्या संघटित चळवळींतून स्वातंत्र्य प्राप्त झालं !

**भाले** ०:– हेंच, हेंच तें तुमचं पक्षपाती सत्य ! ऐतिहासिक सत्य हें आहे कीं वासुकीच्या विषारी फण्याची बाजू जशी दानवांना देण्यांत आली आणखी देव–ते वासुकीचं शेंपूट धरून आरामशीर मंथन करत बसले– अगदीं तशीच पक्षभेद करणारी चळवळ आमच्याहि देशांत झाली ! पुढं स्वातंत्र्याच्या अमृताचं काय झालं ? देवांवरच्या अविश्वासामुळें दानव जेव्हां अमृताचा कलश आपल्या हातीं बळकावूं लागले, तेव्हां मोहिनीचं रूप धारण करून देवांनीं तो लांबवला ! —आमच्या भूदेवांनीं तेंच केलं! सत्ता-संपत्तीची एकसारखी वांटणी करण्याऐवजीं गांधीजींच्या अहिंसेची मोहिनी भूदासांना घालून भूदेव स्वतः सत्ता बळकावून बसले ! हा पक्षपात नाहीं ? हिंसा नाहीं झाली ही ? सत्तेच्या या विषम वांटणीच्या वेळीं कुठं गेली होती तुमची समता –तुमचा तो बंधुभाव ? आतां भूदास खवळले तर त्यांना मात्र सांगतां बंधुभाव ! अहो, एकवचनी, सत्यवादी रामचंद्राला जें साधलं नाहीं तें तुम्ही आतां वानरसेनेला करायला सांगतां ?

**भाऊ०** :–काय साधल नाहीं रामचंद्राला ?

**भाले०** :– ( उपहास करीत ) तो तुमचा इतिहासावेगळा बंधुभाव ! सोन्याच्या लंकेचा दैत्यराज जो रावण त्याच्याशीं बंधुभाव ! आपणतुपण

भाऊ भाऊ असं रावणाला गोडीगुलाबीनं पटवून, त्याचं हृदयपरिवर्तन करून रामराज्य प्रस्थापित करण्याची तुमची थोर महत्त्वाकांक्षा !

भाऊ० :– एवढं तुम्हांला कळतं आहे ना ? मग तुम्ही तरी दैत्यासारखे कां वागतां ?– देवांची विटंबना करणारे– दैत्यराज रावण कशाला होतां ? कशाला अनर्थाला हातभार लावताहात तुम्ही ?

भाले० :– त्यालासुद्धां कारण तुम्हींच ! तुमचंच तत्त्वज्ञान अन् तुमचंच कारस्थान ! रावणाच्या, हिरण्यकश्यपूच्या, दुःशासनाच्या मार्गाला तुम्हीच लावलंत मला ! दैत्यांच्या हिंसेकडे, अनर्थांकडे कानाडोळा करणारे, दैत्यांच्या बचावासाठीं आपला एक डोळा फोडून घेणारे शुक्राचार्यच दैत्यांचे गुरू असतात – समजलांत– 'आचार्य' भाऊसाहेब ! – तक्षक सर्पाला जीवदान देणारे मुनि तुमच्यासारखेच आस्तिक होते ! हं : !

भाऊ० :– जें बोलाल तें सारं खरं आहे !

भाले० :– अर्थात् ! खरं तेंच बोलतों आहे मी ! ज्या समाजातल्या साऱ्या संस्था – विवाह, शिक्षण, न्याय – संस्कृति, निष्ठा, प्रतिष्ठा – परस्पर सहकार्याऐवजीं एका सोन्याच्या खांबावर आज उभ्या आहेत, तिथं निष्कांचन झालेल्या कोटयवधि बुद्धिमान अन् शक्तिमान लोकाना तुम्ही कोणचा आधार देतां ? त्यांची एकजूट करून तो खांब उलथून पाडण्याची हिंमत देतां त्यांना कधीं ? वस्त्रोत्पादक यंत्राचा प्रसाद सर्वांना सारखा वाटण्याच्या कामीं तुम्ही अन् तुमचीं कायदेमंडळं काय करूं शकतात ? पण आपली निर्बलता उघड उघड कबूल करायच्याऐवजीं फाटक्या लोकांच्या तोंडाला तुम्ही चरख्याचीं पानं पुसतां अन् स्वतः गिरणीमालकांच्या आश्रयाला राहतां ! – मग गिरणीमालकच कां होऊं नये मी ? सोन्याच्या लंकेचा राजा रावण कां होऊं नये ? उद्यां रावण झालों तर सारे देव, सारे वेद, सारे पंडे-पाद्री, मुल्ला-मौलवी, सारीं शास्त्रं माझी ताबेदारी करूं लागतील ! माझ्या एका मेंदूच्या दिमतीला बी. बी. सी., रॉयटर, ए. पी. आय्., ए. आय्. आर., तुम्ही, तुमचीं कायदेमंडळं, असलीं असंख्य तोंडं फुटतील – विरोधकांना झोडून काढायला त्यांच्या दुप्पट हात येतील ! – मग माझ्या सोन्याच्या राजवाडयांतली एकेक वीट तोंडावर फेंकून मारली तर कोण माझ्याविरुद्ध ब्र काढणार आहे ! — माझ्या वहीखात्यांतलीं कुलंगडीं मग चित्रगुप्ताच्या बापाला उलगडणं शक्य

नाहीं ! ऐकलात हा सोन्याचा पराक्रम ! – नव्हे, तुमच्या पक्षपाती बंधु-भावाचा परिणाम !

**भाऊ०** :– (चिडल्यासारखे) कसला युक्तिवाद करतांहात ! तुमच्या लोभी वृत्तीचं, तुमच्या राक्षसी महत्त्वाकांक्षेचं खापर माझ्यावर फोडतां ! – तुम्हांला ख्रिस्तासारखं, बुद्धासारखं त्यागी व्हायचं होतं – पण मी आडवा पडलों म्हणून तुम्ही या आडमार्गाला लागलात ! – एरव्हीं महात्मे होणार होतां नाहीं का तुम्ही ?

**भाले०** :– कोणाला आहे हो एवढी महात्मा होण्याची महत्त्वाकांक्षा ! हं : ! मला साधासीधा, स्वाभिमानी 'माणूस' व्हायचं होतं ! पण तुम्ही, तुम्हीच आडवे पडलात ! कौरव – पांडवांच्या झगड्यांत तुमच्यासारखे भीष्माचार्य–द्रोणाचार्य मधें पडले नसते तर महाभारत पांच मिनिटांत आटो-पलं असतं ! पण तुमचं राज्यशास्त्र, तुमची शांति, तुमचं सत्य, तुमचे देव – लहानपणापासून थोडा छळ केला त्यानी माझा ! शाळेच्या पुस्तकासाठीं, फीसाठीं, कुडत्यासाठी, पैसा पैसा करत या सुवर्णभूमीवर भीक मागत हिंडलो ! – सारो शक्ति अन् बुद्धि भीक मागण्याच्या कामो वेंचली ! तुमच्या घरीं कधीं आलं तर माझ्यांतल्या बंडाला प्रोत्साहन देण्याऐवजीं माझ्या प्रामाणिकपणाचा पुळका येऊन मला तीच ती सत्य-अहिंसेची नीरस, भाकड कथा तासन्तास तुम्ही मला सांगावी — अन् तुमच्या प्रासादिक वाणीचं पान चाटून मी परत जावं ! कोणाचं उपाशी पोट असल्या प्रसादानी भरूं शकतं हो ! – अखेर एक दिवस पिसाळून, तुमच्या सत्याची, देवाचीच परीक्षा पहा-यचं ठरवलं मी ! – आणि ह्या, ह्याच तुमच्या घरांत मी त्याची परीक्षा घेतली ! काय केलं असेल मी ! — नीट ऐका ! एकदांच अन् शेवटचंच सांगतो ! — तुमच्याभोंवतीं गोळा होणाऱ्या लोभी बनियांनीं तुमच्या त्या लुचपतखोर सत्यदेवापुढें ठेवलेलीं दक्षिणेचीं नाणीं, नमस्काराच्या निमित्तानी हातचलाखी करून उचललीं, अन् सत्यापेक्षां सट्टयाचा पहिला धडा शिका-यला बाजारांत गेलों ! हः हः हः ! — तुम्ही मला सत्यापुढं हात टेंका-यला शिकवत होतां – आतां सत्यानी माझ्यापुढें हात टेंकले आहेत ! – आतां मी म्हणेन तें सत्य ! मी मानीन ती लोकशाही ! मी देईन तो न्याय ! सुरुवातीला एखाद्या मनस्वी मारवाड्याप्रमाणं पिठांत पाणी कालवून दुधाची

व्हान भागवली ! – आतां ? आतां अश्वत्थाम्याचं बळ कमवून तुमच्यासारख्या धर्ममूर्तींना माझ्यासाठीं खोटं बोलायला लावूं शकतों ! साऱ्या पवित्र वस्तूंची भर समाजांत द्रौपदीसारखी विटंबना मी करीत असतां तुम्हांला भीष्माचार्या-सारखे शांतिपाठ गायला लावूं शकतों ! सारे भीष्माचार्य - द्रोणाचार्य – सारे चिल्लरखुर्दा आचार्य आतां माझ्या आश्रयानी जगताहेत — समजलांत 'आचार्य' भाऊसाहेब ! माझ्याच बाजूनें लढत आता तुम्ही मेलं पाहिजे ! तुमचा पुरुषार्थ, तुमच विहित कर्म, तुमचा हिस्टॉरिकल रोल हाच आहे ! — तुम्ही धर्माला विजयाचे नुसते आशीर्वाद द्यावे, पण मरता मरतां पश्चा-त्तापाच्या सहस्रावधि इंगळ्या लावून घ्याव्या माझ्या बाजूनेंच लढल्यानंतर !

**भाऊ०** :– (भावनाचा उद्रेक अनावर होऊन, सोटा सावरीत, मोठ्यानें) प्राण गेला तरी शक्य नाहीं ! – कोण समजतां हो तुम्हीं स्वतःला ! तुमच्या-साठीं मी मरेन ! – मी ! – अन् तुम्ही अजरामर व्हाल ! अश्वत्थाम्यासारखे चिरंजीव व्हाल ! – [ तुमची ही वल्गना, ही घमेंड — ]

**प्रेमा** :–(रडत रडत त्यांना आवरण्याचा प्रयत्न करते) भाऊ ! भाऊ ! कशाला त्या राक्षसाच्या तोंडीं लागतां ! भाऊ तुम्हांला त्रास होईल ! – अरे देवा रे ! (तोंड झांकून घेते. भाऊसाहेब हातावर कपाळ टेंकून खालीं मान घालतात)

**भाले०** :– थोर माणसाचा पोरकट युक्तिवाद झाला हा भाऊसाहेब ! हूं:! जगांत कोण अजरामर आहे ! आपण सगळेच मरणार आहोंत ! (उसळून) – पण प्रथम भीष्माचार्यांचाच बळी पडला – मगच दुःशासन, दुर्योधन मेले ! जास्तींत जास्त जगण्याची प्रत्येकाला इच्छा असते, तशी मलाहि आहे ! मलाहि, होतां होईल तों मरण येऊं नये म्हणून मीहि धडपडत असतों ! घरांत – घराबाहेर, जमिनीवर – आभाळांत, माणसाकडून – पशूकडून, शस्त्रांनीं-अस्त्रांनीं, दिवसां – रात्रीं, केव्हांहि – कसंहि मरण येऊं नये म्हणून मीहि देवां-वर दबाव टाकतों ! एका पळाचा अवधि मिळाला तर कुठल्याहि पेंचप्रसंगां-तून निसटण्याचा मीहि बंदोबस्त करतोंच ! बस् एक पळ – जस्ट अ मिनिट् ! – एक पळ मला पळायला पुरतं ! (लगेच वास्तवतेची आठवण झाल्यासारखा एकदम गंभीर होऊन) पण इतकंहि करून, माझ्या साऱ्या बंदोबस्तावर मात करणारा अखेरचा एक ऐतिहासिक पेंचप्रसंग येईलच ! त्या प्रसंगीं, उंबरठ्यांत

मला मारणारी शक्ति माझ्यासमोर उभी होईल ! – महादेवासारख्या, हालाहल पचवणाऱ्या, उघड्यावर, थंडीवाऱ्यांत रहाणाऱ्या, व्यसनी, अर्धनग्न,– ज्यांना आपण नंगे म्हणतों ! –अशा नंग्या माणसांतली माणुसकी, सिंहासारखं पाशवी साहस, आणि निसर्गासारखा निर्घृण न्याय, एका तिन्ही सांजेच्या वेळीं एकत्रित होऊन नरसिंहासारखा जागृत होईल, त्या क्षणीं माझा सोन्याचा खांब दुभंगून पडेल आणि उंबरठ्यांत माझ्या विशाल उदराला नख लागून माझीं आंतडीं बाहेर येतील ! ( पुन्हां जोरानें उसळून ) पण तुम्ही ! – सोन्यावर आधारलेल्या साऱ्या संस्थांतून निसटून, स्वतःपुरते सदेह स्वर्गारोहण करण्यासाठीं हपापलेले तुम्ही ! – जातां जातां, आपल्या असत्यावर स्वाक्षरी करण्यासाठीं, तुमचा अंगठा या सत्यसृष्टींत सोडून जाल ! – तुमचा दुर्विलास– तुमची ट्रॅजेडी ही आहे !

**भाऊ०** :– ( त्यांच्या नाका-कानांतून रक्तस्राव होतो. कोलमडून पडतां पडतां शेवटचा श्वास बाहेर पडतो ) आह !

**प्रेमा** :– ( तिच्या हें तावडतोब ध्यानांत येतें. त्याबरोबर किंचाळते ) आई ! – भाऊ ! भाऊ ! ( प्रेताला हालवते – वेड्यासारखी धावत भाऊसाहेबांच्या खोलींत जाते )

**भाले०** :— ( दचकून, प्रेताजवळ जात असतां ) अरे ! – काय झालं ! ( प्रेताला हालवतो, नाडी पहातो, इकडे तिकडे पहातो, निश्वास सोडतो. डोळ्याला रुमाल लावतो ) पूअर मॅन् ! – व्हॉट् पूअर डेथ !

( मगनभाई प्रवेश करतो )

**मगन०** :– कॉन्ट्रॅक्टलोशन ! कॉन्ट्रॅक्टलोशन भालेरावसाहेब ! तुम्ही दोषमुक्त झाल्याबद्दल धन्यवाद !

**भाले०** :–( जड पावलांनीं त्याच्याकडे जात ) फार वाईट झालं मगनभाई ! भाऊसाहेब आपल्याला सोडून गेले !

**मगन०** :– ( घाबरून ) भाऊसाहेब – गेले – अरेरे ! काय झालं हें ? केव्हां गेले ? पैकू त्याचाच रिपोर्ट देण्यासाठीं पोलिस चौकीवर गेला का ? आम्हांला –[ कसं कळवलं नाहीं तुम्ही— ]

**भाले०** :– ( दचकून मोठ्यानें ) पैकू ! चौकीवर ! अरे, थांबा थांबा– यात आला ! ( वेड्यासारखा टेबलाशीं आऊन ब्रीफकेसमधून सोन्याचा

एक देव काढून त्याला देतो ) शेठजी- हें पहा ! हें जवळ ठेवा तुमच्या !"

**मगन०** :- ( आश्चर्यचकित होऊन ) म्हणजे ! ( देवाकडे पहातो )

**भाले०** :- अहो, आपल्याजवळ ठेवा अन् त्याचा जो उपयोग करतां येईल तो करा !—तेवढीच शिल्लक आहे आतां माझ्याजवळ !

( प्रेमा इंजेक्शनची सिरिंज घेऊन धांवत येते. भालेराव तत्परतेनें प्रेताजवळ येतो. शेठजी डोळ्याला रुमाल लावून स्फुंदूं लागतात. प्रेमा इंजेक्शन देत असतां भालेराव प्रेताचा हात धरतो. स्फुंदत स्फुंदतच ती छातीला स्टेथास्कोप लावते. प्रेताला हालवते. स्टेथास्कोप फेंकून देते व मुक्तकंठानें रडूं लागते.)

**भाले०** :- ( तिच्या पाठीवर हात ठेवून तिची समजूत घालण्याचा प्रयत्न करतो ) अशी रडूं नकोस प्रेमा ! अरेरे ! - ( थोडया वेळानें ) शेठजी, इकडे येतां का ? भाऊसाहेबांना आंत नेऊन ठेवूं या !

( शेठजी व भालेराव मिळून प्रेत भाऊसाहेबांच्या खोलींत नेतात. प्रेमा रडतरडत बरोबर जाते. थोडया वेळानें शेठजी डोळयाला रुमाल लावत बाहेर येतात व कोचावर बसून खिन्न मनानें इकडे तिकडे भिरभिर पहात असतात. अर्ध्या मिनिटानें पैकू, रिंगे व पो० कॉन्स्टेबल प्रवेश करतात )

**रिंगे** :- ( दरडावून शेठजीला ) मिस्टर भालेराव !

**मगन०** :— ( दचकून मागें पहातो. पण चटकन् प्रसंगावधान साधून रडण्याचें ढोंग करीत रिंगेच्या गळयांतच पडतो ) इन्स्पेक्टरसाहेब ! भाऊसाहेब सोडून गेले हो आपल्याला ! ( पैकू एकदम रडूं लागतो व भाऊसाहेबांच्या खोलींत जातो )

**रिंगे** :- (गांगरून) भाऊसाहेब गेले ? अरेरे ! म्हणजे हें आहे तरी काय ?

**मगन०** :-(रिंगे मिठी सोडवण्याचा प्रयत्न करतो, पण त्याला न मानतां) गेले हो ! ( रडत रहातो )

**रिंगे** :- ( शेवटीं हात सोडवून घेत असतां मगनभाई त्याच्या हातांत सोन्याचा देव सहज ठेवून देतो. देवाकडे आश्चर्यानें पहात )— म्हणजे ! हें काय ! सोन्याचे देव सांपडले वाटतं !

( शान्ताराम हळूच प्रवेश करतो )

**शान्तू** :-( पाठीमागून रिंगेच्या खांद्यावर हात ठेवून देवाकडे पहात ) काय आहे हें ? ( रिंगे दचकून शान्तूकडे पहातो )

पैकू :–( घाईघाईनें भाऊसाहेबांच्या खोलींतून बाहेर पडून अंतर्गृहांत जातां जातां ) अजी भालेरावसाहेब कुठं बेपत्ता झाले पहा त !

शान्तू } :—बेपत्ता झाले ! (भालेरावच्या खोलींत धांवत जातो)
रिंगे } फरारी ! जवान ! सीटी फुको ! दौडो ! दौडो ! (शान्तू भालेरावच्या खोलींतून धावत बाहेर येतो व घराबाहेर जातो. मगनभाई हळूंच पाय काढतो. रिंगे भाऊसाहेबांच्या खोलींत जातो तो पुन्हा दिसत नाहीं. पैकू घरांतून दिवाणखान्यांत येतो व भालेरावच्या खोलींत धांवत जातो; पुन्हा बाहेर येऊन घराबाहेर जातो. धांवपळीचे आवाज, शिटीचे आवाज, हळूंहळूं दूर गेल्यासारखे विरत जातात. सर्वत्र सामसूम होत असतां हळूंहळू अंधार होत असतो. संपूर्ण अंधार. अंधारांत भालेरावचा अस्पष्ट आवाज ऐकूं येतो. तो वाढत जातो )

आवाज :– बस् ! – एका पळाचा अवधि मला द्या ! – तुमच्या हातून निसटायला पुरे आहे तो मला !

( तख्तपोसासमोर उभी राहून, तख्तपोसालाच उद्देशून भालेरावची कृष्ण-आकृति दृग्गोचर होते )

आकृतिः–अहो, तुम्हीं नाहीं मारूं शकणार मला ! (गंभीर, खोल आवाजांत) महादेवासारख्या, हलाहल पचवणाऱ्या, उघड्यावर, थंडीवाऱ्यात रहाणाऱ्या, व्यसनी, अर्धनग्न–ज्यांना आपण मोठ्या दिमाखानं नंगे म्हणतों ! – त्या प्रलयंकर माणसांतली शुभकर माणुसकी, सिंहासारखं पाशवी साहस, आणि निसर्गासारखा निर्घृण न्याय एकत्रित होऊन जेव्हां नरसिंहासारखा जागृत होईल, तेव्हांच माझीं आंतडीं बाहेर येतील ! ( आतां ती आकृति आपल्या-कडे बोट दाखवून बोलूं लागते ) पण तुम्ही !–तुम्हीं सारे त्या नरसिंहाला जागृत करण्याऐवजीं त्याचा ग्रामसिंह बनवूं पहातां !–त्याला गाढव समजून, त्याच्या पाठीवरून, फटके मारत मारत, स्वर्गाच्या सफरीला निघालेले तुम्ही! – हाः हाः हाः ! – गाढव तुम्हाला उकिरड्यावरच नेऊन सोडील ! – उकिरड्यावर नेल्याशिवाय रहाणार नाहीं, समजलांत ! – आणि मी ! –मी मात्र चिरंजीव होईन, आणि साऱ्या सृष्टीवर राज्य करीन ! हाः हाः हाः !

( पुन्हां सर्वत्र अंधार – गंभीर घंटानाद — तो नाद हळूं हळूं अस्पष्ट होत असतां—)

[ समाप्तीचा पडदा. ]

# आभार : क्षमा : अर्पण

माझें हें दुसरें नाटक अनेक अर्थांनीं, माझ्या 'चित्रशाळा' या पहिल्या नाटकाचा परिपाक आहे. 'चित्रशाळे' चें वाङमय म्हणून जें हार्दिक स्वागत झालें तें झालें नसतें तर हें नाटक लिहिण्याचा मला धीर झालाहि नसता ! 'चित्रशाळे' मुळे अनेक कलाकारांशीं व टीकाकारांशी माझा परिचय झाला व त्यांचा या नाटकात मला उपयोगहि झाला. माझे मित्र आचार्य दादा धर्माधिकारी यानी 'चित्रशाळे' ला लिहिलेल्या प्रस्तावनेमुळें तर या नाटकाची मला स्फूर्ति झाली !

'सोन्याचे देव' प्रसिद्ध करण्यापूर्वी अर्थातच मी अनेक कलाकार व टीकाकार स्नेह्यांना वाचून दाखविलें. नाटकांत फारशीं दोषस्थळें जर कोणाला आढळलीं नाहींत तर त्याचें श्रेय मी त्यानाच देतों. विशेषत: माझे स्नेही श्री. शान्ताराम द्वारकानाथ देशमुख, सौ. सुनीता देशपांडे, नागपूर नाट्य मंडळाचे बरेचसे सभासद आणि माझे कांहीं गांधीवादी मित्र यांच्या निर्दय पण विधायक टीकेमुळेंच वाचकांना व प्रेक्षकांना जास्तींत जास्त मान्य होईल असा बदल माझ्या हस्तलिखितांत करून आजच्या स्वरूपांत मला हें नाटक सादर करतां आलें. या सर्व स्नेह्यांचा मी अत्यंत अभारी आहें.

'चित्रशाळे' ला प्रस्तावना लिहिल्याबद्दल नागपुरांतील कांही वर्तमानपत्रांनीं, विशेषत: 'भवितव्य' या साप्ताहिकानें, आचार्य दादा धर्माधिकारी याचेवर पक्षनिष्ठ राजकीय टीका अत्यंत क्षुद्र मनोवृत्तीनें केली. माझ्यासाठीं दादांना भोगाव्या लागलेल्या या दुष्परिणामाबद्दल मी त्यांची मन:पूर्वक क्षमा मागतों.

अशा क्षुद्र मनोवृत्तीच्या टीकेला भीक न घालतां 'सोन्याचे देव' या नाटकास आपली जोरदार प्रस्तावना जोडून, वीर वामनराव जोशी यांनीं या नाटकावर जे उपकार केले आहेत त्याबद्दल मी त्यांचे कितीहि आभार मानले तरी थोडेच होतील.

या नाटकांतील सर्व पात्रें पूर्णपणें काल्पनिक आहेत. कोणत्याहि विशिष्ट व्यक्ती डोळ्यांपुढें ठेवून त्यांना नांवें दिलेलीं नाहींत. नामसादृश्यामुळें एखादी व्यक्ति वाचकांच्या किंवा प्रेक्षकांच्या दृष्टीपुढें उभी झाली तर तो केवळ योगायोगच मानण्यांत यावा.

हें नाटक अगदीं थोड्या अवधींत प्रकाशित केल्याबद्दल प्रकाशकांचा आणि मुद्रणाच्या कामीं आदर्श मुद्रणालयांतील सर्व कार्यकर्त्यांनीं आपुलकी दाखवल्याबद्दल त्यांचाहि मी अतिशय आभारी आहे.

'सोन्याचे देव' चें मूळ आचार्य दादा धर्माधिकारी यांच्या 'चित्रशाळे'-च्या प्रस्तावनेंत आहे. त्यांनाच हें नाटक मी आदरपूर्वक अर्पण करीत आहे.

गोखले व्हिला, कॉंग्रेसनगर,
नागपूर, १४ जून १९४९

— नाना जोग